## मागें वळून –

वाचकांनो, चला जरा आपण पुन्हां मागें वळू आणि ती उत्तुंग शिखरांची सुंदर रांग पाहूं. ओहो ! किती उंच हीं शिखरें, किती नामी, किती थोर !

या साती शिखरांची भव्यता कांहीं औरच वाटते ! हीं शिखरें न्याहाळतांना त्यांचा केवढा आधार आपल्या पाठीशीं आहे तें कळून येऊन मन उल्हसित होतें ! म्हणूनच वाटलें आणि म्हटलें की जरा मागें वळून पाहूं आणि पुन्हां पुढली वाट चालू. हीं साती शिखरें एवढीं उंच आहेत कीं, आपण जेव्हां जेव्हां मागें वळून पाहूं तेव्हां तेव्हां तीं कोठूनहि आपणांस दिसतील, आणि आपल्या दर्शनानें हर्षवितील.

या शिखरांवर चढून जाणें दुर्घट यांत संशयच नाहीं. तथापि या साती पर्वतांच्या पायथ्यांपाशीं मी पुष्कळदा जाऊन राहिलो आहें. या सर्व पर्वतांना मी प्रदक्षिणा केल्या आहेत. इतकेंच काय, यांवर राहणाऱ्या आणि अगदीं शिखरावर विहार करणाऱ्या साती ऋषींचे आश्रमांत संधि साधेल तशीं कोणाचीं दर्शनें घेतलीं आहेत, कोणाचीं प्रवचनें ऐकिलीं आहेत, कोणाशीं सलगीहि केली आहे.

आता ते ऋषि येथून गेले ! त्यांचे प्रत्यक्ष दर्शन आतां घडणार नाहीं. पण त्यांचें स्मरण रहावें या हेतूनें पुढील 'सात सुमनें' मी तुम्हांस अर्पण करीत आहे. त्यांचा आस्वाद तुम्हांला सुखकारक, उद्‌बोधक व प्रोत्साहक वाटेल असा भरवसा वाटतो.

हे सगळेच ऋषि एकदम आले आणि एकदम एकाच वेळी गेले असें नाहीं. त्यांचीं हीं स्मरणचित्रें एकाच वेळीं म्या काढलीं असेंहि नाही. एवढें अनुसंधान ठेवून तुम्हीं जर त्यांचा आस्वाद घ्याल तर तुम्हांला कसलीच अडचण पडणार नाहीं; माझे आणि माझ्या प्रकाशकांचे मनोरथ सहज सिद्धीस जातील.

वैशाख व. ९, १८७२
'लोककल्याण', पुणें

दत्तो वामन पोतदार

एकमेव विक्रेते
**कॉंटिनेंट प्रकाशन**
टिळकरोड, पुणें २.



## आगामी प्रकाशनें

(१) **आणि माणसाचा मुडदा पडला !**
ले. रामानंदसागर
अनु. श्रीपाद जोशी

(२) **मुक्तजीवन व अनुभव आणि आचार**
ले. जे. कृष्णमूर्ति
अनु. एन्. आर. ढोले.

(३) **महामहोपाध्याय पोतदार यांचीं भाषणें.**

(४) **सूर्यकुलव्यवस्था** (अनेक लेखक)
ज्योतिर्विद्या परिसंस्थेच्या विद्यमानें
झालेल्या व्याख्यानाचा विस्तृत सारांश

(५) **लाखाची गोष्ट**
ले. नाना जोग

**पां. रा. ढमढेरे प्रकाशन :**
२२२/३ सदाशिव पेठ, पुणें २.



# १. वि. का. राजवाडे

हृदयाची क्रिया एकाएकी बंद पडून या महापुरुषाचा अंत धुळें मुक्कामीं शुक्रवार ता. ३१ रोजीं प्रातःकाळीं झाला हें वृत्त वाचून प्रथम आश्चर्य आणि त्याच्या पाठोपाठ शोक यांचा धक्का बसून विव्हल झाला नाहीं असा सुशिक्षित आणि देशाभिमानी महाराष्ट्रीय विरळाच सांपडले. राजवाडे यांचे तें बांधेसूद आणि मेहनतीनें कमा- विलेलें शरीर ज्यांनीं पाहिलें असेल त्यांस तर हें त्यांच्या मृत्यूचें वृत्त प्रथम खोटेंच वाटेल. राजवाड्यांची ती साधी परंतु उग्र आणि करारी मूर्ति यापुढें प्रत्यक्ष सृष्टींत पुनरपि दृष्टीस पडावयाची नाहीं यांत आतां संदेह नाहीं. मात्र कार्यरूपानें महाराष्ट्रीयांच्या चित्तांत ठसलेली त्यांची मूर्ति अजरामर राहील हेंहि तितकेंच निःसंदेह आहे.

विश्वनाथपंत ऊर्फ विसुभाऊ राजवाडे यांचा जन्म शके १७८६ आषाढ शु. ८ स झाला. यावरून मृत्युसमयीं त्यांस ६३ वें वर्ष चालू होतें. त्यांनीं स्वतः 'ग्रंथमालें' त स्वतःच्या शिक्षणाचा जो वृत्तान्त दिला आहे त्यावरून (शके १८०४) इ. स. १८८२ त वयाच्या अठराव्या वर्षी त्यांनी मॅट्रिक परीक्षा पास होऊन थोडे दिवस एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें राहून पुढें ते डेक्कन कॉलेजांतून इ. स. १८९० सालीं बी. ए. झाले. मॅट्रिकपावेतोंचें त्यांचें शिक्षण कांहीं घरीं आणि कांहीं बाबा गोखले, नातू, बोमंट आणि भावे यांच्या

शाळांतून झालें. डेक्कन कॉलेजांत १८८४ ते १८९० या वर्षांत गणित वगैरे निरनिराळे ऐच्छिक विषय आलटून पालटून घेऊन अखेर इतिहासांत ते परीक्षेतून उत्तीर्ण झाले.

कॉलेजांत असतांना राजवाडे यांनीं तालीम, पोहणें आणि होडी वल्हविणें इत्यादि व्यायाम पुष्कळच घेऊन मजबूत शरिराची आणि निकोप प्रकृतीची जोड करून घेतली; आणि पुढें जें कष्टमय आयुष्य त्यांना कंठावें लागलें आणि जे उपासतापास आणि सायास सोसावे लागले त्याची तयारी करून ठेवली. खेरीज वनस्पतिशास्त्र, मानसशास्त्र, आणि फारसी भाषा व थोडें फ्रेंच हींहि त्यांनीं अवगत करून घेतलीं. अशा रीतीनें उत्तम कमावलेलें शरीर आणि अनेक शास्त्रांच्या अध्ययनानें कमावलेली बुद्धि असें मौल्यवान् भांडवल त्यांनीं संपादन केलें.

या काळांत कॉलेजांतील जुजबी शिक्षणापेक्षां स्वतःचें वाचन आणि मनन यांजवरच राजवाडे यांनीं विष्णुशास्त्र्यांप्रमाणें भर दिला होता. त्यामुळें ठरीव सांचांतून निघणाऱ्या तत्कालीन पदवीधरांप्रमाणें विद्यापीठांतून बाहेर पडतांच नोकरीकरितां अर्ज करण्याचा मामुली रस्ता त्यांनीं स्वीकारला नाहीं. असा परिणाम मुख्यतः (१) चिपळूणकरांची निबंधमाला (२) साऱ्यांचा काव्येतिहाससंग्रह आणि (३) परशुरामपंतांचें नवनीत या तीन ग्रंथांचे परिशीलनामुळ झाला. ' पहिल्याचे योगानें इंग्रजींतून लिहिण्याबोलण्याच्या दुष्ट खोडीपासून आपला बचाव झाला; दुसऱ्यानें स्वदेशाची ओळख करून दिली; आणि तिसऱ्यानें मराठी सारस्वताची प्रीति व अभिमान उत्पन्न केला' असें स्वतःच्या वृत्तान्तांत राजवाडे म्हणतात.

बी. ए. होण्यापूर्वीच म्हणजे इ. स. १८८८ चे सुमारास मराठी इतिहासाच्या खोल अध्ययनास राजवाडे यांनीं प्रारंभ केला, आणि

सुमारें दहा वर्षांनीं (१८९८) येरंडे–दप्तरांतील पानिपत-प्रकरणींचा अत्यंत महत्त्वाचा असा 'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें' या आपल्या मालेंतील पहिला खंड त्यांनीं प्रसिद्ध केला.

यापूर्वीच उदरनिर्वाहासाठीं एक वर्ष भावे-शाळेंत आणि पुढें दोन वर्षें न्यू इंग्लिश स्कूलमध्यें शिक्षकाचा व्यवसाय राजवाडे यांनीं केला. इ.स. १८९५ त 'भाषांतर' या नांवाचे एक स्वतंत्र मासिक पुस्तक राजवाडे हे शिवराम महादेव परांजपे, दिनकर त्रिंबक चांदोरकर प्रभृतींच्या साहाय्यानें चालवीत होते. हा उपक्रम अत्यंत अभिनंदनीय होता. राजवाडे यांनीं प्लेटोचें सुराज्य (रिपब्लिक), मॉंटेस्क्यूचें एस्प्रि द लॉज, इ. प्रख्यात ग्रंथांचीं भाषांतरें यांतून प्रसिद्ध करणें प्रारंभिलें होतें. परंतु दुर्दैवानें रविवार पेठेंतील फडके वाड्यांतील विठ्ठल छापखान्यास आग लागून राजवाडे यांचीं व इतरांचीं सर्व मुद्रित व अमुद्रित भाषांतरें वगैरे जळून खाक झालीं आणि राजवाडे जवळजवळ कफल्लक बनले. कुटुंब वारल्यानंतर तो एक पाश तुटला आणि 'भाषांतर' जळल्यामुळें हा नवा व्यवसाय खुरटला, आणि आपल्या आयुष्यांतील महत्कार्याला अनन्यभावानें लागण्यास राजवाडे सिद्ध झाले.

म. इ. साधनांचा पहिला खंड (प्रथम मुद्रण) शके १८१९ त विठ्ठल छापखान्याबरोबर जळाल्यामुळें शके १८२० त तो खंड वांईस लेल्यांच्या मोदवृत्तांत छापून प्रसिद्ध करावा लागला. तेव्हांपासून शके १८४८ पावेतों सुमारें अडीच तपें राजवाडे यांनीं महाराष्ट्राची किंवा पर्यायानें सर्व जगाची सेवा केली. या सेवेचें प्रचंड आणि प्रभावी स्वरूप साकल्यानें पाहणारास राजवाडे ही किती थोर आणि कर्ती व्यक्ति होती आणि त्यांनीं केवढें पर्वतप्राय आणि चिरायु कार्य केलें याची पक्की खात्री पटेल. एवढ्या अवधींत त्यांनीं ऐतिहासिक कागदपत्रांचे बावीस खंड, इतर सहा स्वतंत्र ग्रंथ व 'भाषांतर' मासिकाचे तीन

खंड प्रसिद्ध केले आणि निरनिराळ्या १०।१२ मासिकांतून आणि वृत्तपत्रांतून टीकापर, चर्चापर आणि स्वतंत्र असे जे शेंकडों लेख प्रसिद्ध केले आहेत त्यांचे निदान तीन तरी खंड सहज होतील. याचा हिशेब पाहतां अठ्ठावीस-तीस वर्षांत सालिना निदान एक या प्रमाणें त्यांनीं ग्रंथ प्रसिद्ध केले. राजवाडे यांचे हे ग्रंथ निरनिराळ्या ठिकाणीं प्रसिद्ध झाले असून अतीव दुर्मिळ झाले आहेत. यास्तव ते कोठें केव्हां प्रसिद्ध झाले याचें एक कोष्टकच येथें मुद्दाम देतों:—

## मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें

खंड १ ला शके १८२०, दुर्मिळ ( पानिपत प्रकरणीं कागद ) भा. इ. सं. मंडळाकडे विक्रीस. खंड २ रा—पेशवाई शकावलि, ग्रंथमाला ( दुष्प्राप्य ). खंड ३ रा—ब्रह्मेंद्रपत्रें इ. ग्रंथमाला ( दुष्प्राप्य ). खंड ४ था—शकावलि वगैरे ( शकावलि व बखरी यांचें विस्तृत विवेचन करणारी प्रस्तावना ) चित्रशाळा ( दुसरी आवृत्ति ). खंड ५ वा—पेशवेकालीन पत्रें ग्रंथमाला ( दुष्प्राप्य ). खंड ६ वा—नानासाहेब पेशवे प्रभृति पत्रांचा, इतिहासस्वरुपाविषयीं मोठी प्रस्तावना, ग्रंथमाला ( दुष्प्राप्य ). खंड ७ वा—काळे-दप्तर प्रती भा. इ. सं. मंडळाकडे. खंड ८ वा—बावडेकर दप्तर ( महत्त्वाची प्रस्तावना ) ग्रंथमाला ( दुष्प्राप्य ), खंड ९ वा—'प्रभातां' तील लेख ( दुष्प्राप्य ) धुळें सत्कार्योत्तेजक सभा. खंड १० वा--सवाई माधवरावकालीन पत्रव्य. प्रती भा. इ. सं. मंडळाकडे. खंड ११ वा—चासकर दप्तर, प्रती भा. इ. सं. मंडळाकडे. खंड १२ वा—रायरीकर दप्तर, भा. इ. सं. मंडळाकडे. खंड १३।१४—रायरीकर व खासगीवाले दप्तर, भट आणि मंडळी, पुणें. खंड १५ वा—शिवकालीन, जेधे प्रभृति घराणीं सत्कार्यो-

त्तेजक सभा, धुळें. खंड १६, १७, १८, १९–शिवकालीन घराणीं इतिहाससंग्रह–निर्णयसागर, मुंबई. खंड २०–शिवकालीन घराणीं भा. इ. सं. मंडळ, पुणें. खंड २१ व २२–शिवकालीन घराणीं इतिहास व ऐतिहासिक, सत्कार्योत्तेजक सभा, धुळें. हे झाले साधनखंड. स्वतंत्र ग्रंथांत (१) संकीर्ण लेखसंग्रह (दुष्प्राप्य); ग्रंथमाला (२) संस्कृत भाषेचा उलगडा (सत्कार्योत्तेजक सभा, धुळें); (३) महिकावतीची बखर (४) राधामाधवविलास–चंपू (चित्रशाळा, पुणें); (५) ज्ञानेश्वरी प्रस्तावनेसह (सत्कार्योत्तेजक सभा, धुळें); (६) सुबंतविचार (भा. इ. सं. मंडळ, पुणें) (७) ज्ञानेश्वरीचें मराठी व्याकरण (सत्कार्योत्तेजक सभा, धुळें); (८) तिङ्गंतविचार (प्राचीप्रभा–फोंडा, गोवा; दुष्प्राप्य) आणि (९) मराठी छंद (पुनर्मुद्रण–विश्वनाथ गणेश आणि मंडळी, पुणें (१०) दासोपंतांचीं पदें–लेले, वाई (दुष्प्राप्य) पैकीं क्र. १, ८, ९ व १० हे मासिकांतून प्रकाशित झाल्यानें ग्रंथ सहाच असें वर म्हटलें आहे.

फुटकळ जे शेंकडों लहानमोठे लेख, विवेचनें व टिपणें मिळून राजवाडे यांचें अफाट लिखाण आहे तें बहुश: ग्रंथमाला, विश्ववृत्त, लोकशिक्षण, सरस्वतीमंदीर, राष्ट्रोदय, इतिहास आणि ऐतिहासिक, रामदास आणि रामदासी, विद्यासेवक, चित्रमयजगत् आणि भा. इ. सं. मंडळाची ग्रंथमाला यांतून आणि केसरी व ज्ञानप्रकाश व समर्थ या पत्रांतून प्रसिद्ध झालेलें आहे. म. इ. साधनांच्या कित्येक खंडांना जोडलेल्या विस्तृत आणि विवेचक दीर्घ प्रस्तावना याहि एका प्रकारें स्वतंत्र म्हणून जर वरील लिखाणांतच समाविष्ट केल्या तर या सर्व लिखाणांचें यथास्थित वर्गीकरण करणें सुलभ जाईल. हें लिखाण बहु-

मोल असून आज आपल्या अक्षम्य उपेक्षेमुळें अत्यंत दुर्मिळ झालेलें आहे. याचें पुनर्मुद्रण फार त्वरित व्हावयास पाहिजे.

या बहुविध लिखाणाचें स्थूल वर्गीकरण विषयानुरोधानें करणें प्रशस्त होईल:– (१) ऐतिहासिक, तात्विक व विवेचनात्मक आणि ज्ञानसंवर्धक अथवा शोधात्मक (२) टीका प्रतिटीकात्मक (३) नैरुक्तिक (४) सामाजिक आणि समाजशास्त्रीय (५) राजकीय आणि (६) इतर. हें वर्गीकरण अर्थातच स्थूल आहे आणि राजवाडे यांचे बरेंच लेख यांतील अनेक शाखांत एकाच वेळीं बसूं शकतील. तूर्त स्वीकृत वर्गीकरणाप्रमाणें पाहिलें असतां ह्यांचे पुढील लेख अत्यंत अभ्यसनीय आणि मननीय आहेत असें म्हणतां येईल.

**ऐतिहासिक**–पहिला, तिसरा, चौथा, सहावा, आठवा आणि अकरावा या खंडांच्या प्रस्तावना पाहिल्यास पहिल्यांत पानिपत-प्रकरणाचें केलेलें विवेचन राजवाडे यांच्या अद्वितीय प्रतिभेची विलक्षण साक्ष देतें. तिसऱ्यांतील ब्रह्मेंद्र स्वामींवरील हल्ला प्रेक्षणीय आहे. पारसनीस यांचा डोलारा क्षणैक नेस्तनाबूद करून ब्रह्मेंद्र आणि समर्थ यांचें वैषम्य तो मनावर ठसवितो. चौथ्यांत शिवाजीमहाराजांच्या बखरींचें सूक्ष्म व मार्मिक पृथक्करण व परीक्षा व शिवचरित्रांतील कित्येक प्रसंगांचें चिकित्सक विवेचन फारच मार्गदर्शक आहे.

सहाव्यांतील इतिहासस्वरूपाचें विवेचन पाहतां तर मोठमोठे कार्लाईल, नित्सेसारख्यांचे लेख फिक्के वाटूं लागतात. आठव्यांत मराठी भाषेच्या प्राचीन व अर्वाचीन स्थित्यंतराचें अत्यंत उद्बोधक विवेचन असून स्वभाषा सोडून परभाषाद्वार करणाऱ्या विद्वानांचा खरपूस समाचार घेऊन आजची आपली स्वभाषाविषयक उदासीनता अशीच टिकली तर स्वभाषा मिश्र नव्हे, भ्रष्ट नव्हे, तर नष्ट होईल असा स्वच्छ इषारा दिला आहे आणि याचाच अनुवाद शारदोपासक

संमेलनाच्या अध्यक्षपीठावरून राजवाडे यांनीं पुनः केला होता हें प्रसिद्ध आहे. अकराव्या खंडाची प्रस्तावना लहान पण चटकदार असून त्यांत इतिहासविषयक समाजांतील अनास्थेचें मोठ्या तळमळीनें प्रदर्शन केलें आहे. राधामाधवविलासचंपू आणि महिकावतीची बखर यांच्या प्रस्तावना ऐतिहासिक आणि समाज-शास्त्रीय अशा उभयविध स्वरूपाच्या आहेत. याशिवाय, ‘ इतिहास व ऐतिहासिकां ’त इतिहाससंशोधनाच्या सद्यःस्थितीविषयीं उत्कृष्ट लेख आहेत. या सर्व लेखांत राजवाडे यांची बहुश्रुतता, ओजस्विता आणि सत्यनिष्ठुरता प्रतिबिंबित झालेली आढळून येते. किंबहुना त्यांची एक ओळहि अशी नाहीं कीं जीवर त्यांच्या व्यक्तित्वाचा अढळ ठसा उमटलेला आढळणार नाहीं. किरकोळ शोधात्मक व विवेचनात्मक लहानमोठीं टांचणें या लेखांशिवाय शेंकडों आहेत.

टीका प्रतिटीकात्मक लेखांत राष्ट्रोदयांतील किंकेडच्या ग्रंथांवरील लेख, केसरींतील बाजीराव मद्यवाद, ज्ञानेश्वरीवाद, इत्यादि कैक सांगतां येतील.

**नैरुक्तिक**—राजवाड्यांचें संशोधन चौरस होतें. ते केवळ कागद किंवा चित्रमूर्ति पाहूनच राहत नसत; तर यावच्छक्य सर्व ऐतिह्य साधनें पाहण्याचा त्यांस हव्यास होता. आणि त्यांच्या शोधाची कालमर्यादा वेद आणि वेदपूर्व प्रमाणांपासून तों तहत वर्तमानकाला-पावेतों अखंड पसरलेली दिसते. अलिकडे अलिकडे पांचदहा वर्षें कागदी साधनांची संगति कमी करून ते प्राचीन शब्दसाधनांची फोड करून एकेका शब्दाच्या पोटफाडींतून ज्ञानरत्नें बाहेर काढण्याच्या रमणीय व्यवसायांत व्यग्र होते. त्यांनीं शेंकडों शब्दव्युत्पत्ति या काळांत बसविल्या. जुनी ज्ञानेश्वरी उपलब्ध झाल्यापासून या शाखेकडे त्यांचें लक्ष जास्तच वेधलें आणि त्यांची अखेरीची चारपांच वर्षें मराठी

धातुकोश रचण्यांतच खर्च झाली. मोठ्या प्रयासानें त्यांनीं सुमारें दहा हजार मराठी धातूंचा पत्ता लावून हा कोश बनविला आहे. त्याच्याच मुद्रणसंस्करणाचा उद्यम त्यांच्यापुढें प्रामुख्यानें होता. आणि हा कोश प्रसिद्ध झाल्यानंतर त्या वेळीं राजवाडे यांच्या अचाट परिश्रमाची तो भरपूर साक्ष देतो. या सार्वभाषिक अथवा नैरुक्तिक लेखांत त्यांनीं लिहिलेला 'विचार-विकार-प्रदर्शनांच्या साधनाची इतिहासपूर्व व इतिहासोत्तर उत्क्रांति' हा छापलेला निबंध केवळ अपूर्व आहे, म्हणजे असें प्रौढ विवेचन युरोपीय ग्रंथांतूनहि आढळणें कठीण आहे. या लेखांत मानववाणीचा विकास यासारख्या अति कठीण विषयाचे पापुद्रे अशा विलक्षण कौशल्यानें उकलून दाखविले आहेत कीं, तें कौशल्य पाहून वाचक थक्क होतो;आणि असला खंदा आणि वाचमर्थोनु धावति कोटीतला हा लेखक आमच्या महाराष्ट्रांत विद्यमान् असतां आमच्या मायभाषेच्या सामर्थ्याविषयीं शंकित होऊन बडबडणाऱ्यांची कींव येते.

समाजशास्त्रीय लेखांत हिंदु समाजांत हिंद्वितरांचा प्रवेश ( भा. इ. सं. मंडळ ), भारतीय विवाहपद्धति ( चित्रमयजगत् ) इत्यादि लेख येतात. अद्यापि या शाखेंतील त्यांचे बरेच लेख अप्रसिद्ध राहिलेले असावेत असें वाटतें. हाहि व्यासंग त्यांनीं फार वाढविला होता. नैरुक्तिक व भाषिक साधनांचा या कामीं उपयोग करून राजवाडे यांनीं 'महाराष्ट्राचा वसाहतकाल' या नांवाची एक लेखमाला प्रसिद्ध केली आहे. त्यांत हजारों ग्रामनांवांचा मोठा मार्मिक अभ्यास करून वसाहतकालीन महाराष्ट्राच्या इतिहासांतील अंधःकारांत कांहीं प्रकाशकिरण फेकले आहेत. या लेखावलीवरून राजवाड्यांची दांडगी कल्पनाशक्ति स्पष्ट प्रतीत होते. पुढला विभाग राजकीय लेखांचा केला तर त्यांतहि सामाजिक व राजकीय असे उभयविध कांहीं लेख

घ्यावे लागतील. सुरतेची राष्ट्रीयसभा ( सरस्वतीमंदिर ), गोखल्यांची इंग्लंडांतील कामगिरी ( विश्ववृत्त ), स्वदेशी ( विश्ववृत्त ), वेदोक्त ( विश्ववृत्त ), बडोदें राज्यांतील सुधारणा ( विश्ववृत्त ), संबंधट्चालन-मीमांसा ( चित्रमयजगत ). महाराष्ट्रांतील गेल्या पाऊणशें वर्षांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद ( लोकशिक्षण ) इत्यादि अत्यंत मननीय लेख या शाखेंत मोडतात. हे सर्व लेख वाचले असतां त्यांत जेवढें प्रखर, स्पष्ट आणि निस्संदेह राजकीय तत्त्वज्ञान ग्रथित झालेलें असेल तेवढें एवढ्याच अवकाशांत इतरत्र कोठें सांठविलेलें आढळणार नाहीं. यांतील कित्येक लेखांत ज्या संवादपद्धतीचा आणि प्रश्नपद्धतीचा अवलंब केला आहे ती पद्धती तर मराठींत दुसऱ्या कोणासहि साधलेली दिसत नाहीं. या लेखांतील भेदक आणि अचूक विवेचन सर्वांनीं अवश्य वाचण्यासारखें आहे.

इतर संकीर्ण लेखांत रामदास ( ग्रंथमाला ), कनिष्ट, मध्यम व उच्च शालांतील स्वानुभव ( ग्रंथमाला ), कादंबरी ( ग्रंथमाला ), बडोदें साहित्यसंमेलन ( राष्ट्रोदय ), शिवकालीन समाजरचना ( केसरी ) इत्यादि लेख विशेष संस्मरणीय गणतां येतील.

**स्वतंत्र ग्रंथ**— यांत ज्ञानेश्वरी आणि ज्ञानेश्वरी-मराठीचें व्याकरण हे दोन ग्रंथ आणि सुबंततिङ्गंतविचार आणि मराठी छंदावरील निबंध तसेंच संस्कृत भाषेचा उलगडा या भाषिक ग्रंथांबद्दल थोडें लिहिलें पाहिजे. ज्ञानेश्वरीची प्रस्तावना म्हणजे राजवाडे यांची गाढी विद्वत्ता आणि व्यापक दृष्टि यांचें सुलक्षण प्रदर्शन होय. एवढ्या ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनारूप एका प्रबंधावर लुब्ध होऊन कोणत्याहि विद्यापीठानें त्यांचा बहुमान केला असता परंतु आमचें आंधळें मुंबई विद्यापीठ स्वदेशांतील जातिवंत, प्रतिभावंत आणि सामर्थ्यवंत अशा टिळक-राजवाड्यासारख्या विद्वच्छिरोमणींचा स्पर्शहि आपणास होऊं देत नाहीं आणि

अशा वस्तुस्थितीत संतोष मानणारेहि कैक भोळे आमच्यांतच दिसून यावेत हें किती शोचनीय आहे? ज्ञानेश्वरी-व्याकरणाचा विचार केसरींत अग्रलेखांचे द्वारें पूर्वीच झालेला वाचकांस आठवतच असेल. अद्यापिहि या व्याकरणाचे द्वारें आणि सुबंततिङ्गंतादि ग्रंथाद्वारें राजवाडे यांनीं जे सिद्धांत पुढें आणले आहेत त्यांचा विचार आमच्या इकडील विद्वानांस झेपत नाहीं असें म्हणणें प्राप्त आहे. सुप्रसिद्ध फ्रेंच पंडित ब्लोश मात्र त्यांचा उपयोग करतो ! माझे हे ग्रंथ आणखी वीस वर्षांनंतर लोकांस समजूं लागतील. मी माझ्या करमणुकीसाठीं हे छापले असें राजवाडे पुष्कळ वेळां विनोदानें बोलत त्यांत फार खोल अर्थ असे यांत संशय नाहीं.

मराठी छंदावरील त्यांचा निबंध आतां कोठें एम. ए. च्या परिक्षे-साठीं नेमला आहे. संस्कृतभाषेचा उलगडा हा ग्रंथ तर त्यांच्या सर्व ग्रंथांत अति अवघड उतरला आहे. काठिन्य हें त्या विषयाच्या अंग-भूतच आहे खरें; खेरीज या गहन विषयाचें ज्ञानहि साधारण बहुश्रुत वाचकांसहि बेताचेंच.

## राजवाड्यांची तपश्चर्या

असो. येणेंप्रमाणें राजवाडे यांच्या लिखाणाचीं थोडक्यांत माहिती दिली; वयाच्या अठराव्या वर्षी मॅट्रिक, चोविसाव्यांत बी. ए., तिशींत एका भारदस्त मासिकाचा चालक व संपादक आणि चौतिसाव्यांत एक तरुण पण गाढा इतिहासविवेचक अशा पायऱ्या चढत चढत राजवाडे यांनीं शके १८३१–३२ सालीं म्हणजे वयाच्या पन्ना-शीच्या आंत आपला एक संप्रदायच निर्माण करून दाखविला आणि हें अवजड कार्य केवळ स्वतःच्या बुद्धिप्रभावानें, परिश्रमानें आणि एकनिष्ठेनें यशस्वी केलें आणि तज्ज्ञमंडळांत अग्रस्थान मिळविलें. हें

जसें राजवाडे यांस व्यक्तिशः भूषणावह होय तसेंच तें या आपल्या महाराष्ट्रासहि निःसंशय अभिमानावह होय यांत संशय नाहीं. अंगच्या अलौकिक बुद्धीला उत्तम कमावलेल्या शरीराची जोड करून देऊन, कनक आणि कांता यांच्या मोहापासून सर्वथा अलिप्त राहून एकाग्रतेनें स्वीकृत कार्याचे सिद्धीसाठीं मोठ्या करारी बाण्यानें या कष्टाळू थोर पुरुषानें तपश्चर्या केली म्हणूनच त्यांचा एवढा गौरव करणें आपलें कर्तव्य आहे.

राजवाड्यांचे पूर्वीं कीर्तने, साने, रानडे, गुप्तेप्रभृति विद्वानांनीं इतिहाससंशोधनास प्रारंभ केला होता. पण या सर्व मंडळींत एक रानडे वजा घातले तर राजवाड्यांइतका प्रतिभाशाली गृहस्थच कोणी पडला नाहीं यांत शंका नाहीं. शिवाजीमहाराजांनीं देशासाठीं फकिरी घेतली आणि राजवाडे यांनीं राष्ट्रीय स्मृतिसंचलनासाठीं तशीच फकिरी घेतली आणि प्रो. भानू नेहमीं लिहितात त्याप्रमाणें समर्थ पदवी नव्यानें शोभविली, श्रीसमर्थांच्या चरित्राच्या उपेक्षितांगाचें रहस्य यथार्थ जाणून आचरणांत आणणारा त्यांच्यासारखा दुसरा पुरुष शोधून काढून दाखविणें कठीण आहे. समर्थ पदवीचें हें हें रहस्य विद्यावैभवार्थ मंडळीकरणांत आहे. तेंहि करण्याचें ठरवून खरे, पारसनीसप्रभृतींचा आणि इतरांचा जो शोधव्यवसाय कैक वर्षें संथपणें आणि दृढनिश्चयानें चालू होता त्या सर्वांस एकीकृत करण्यासाठींच श्री. सरदार मेहेंदळे यांचे सहकारानें आषाढ शु. १।१८३२ रोजीं त्यांनीं भारत-इतिहास-संशोधन मंडळाची स्थापना केली. आरोग्य मंडळाची स्थापना पुण्यांत राजवाडे यांनींच कै. डॉ. देव यांचे मदतीनें केली. त्याच ओघांत पुढें शिक्षाविचारमंडळाची स्थापना झाली.

भौतिक शास्त्रांच्या गाढ अभ्यासाची अत्यंत आवश्यकता राजवाडे यांस निरंतर भासे आणि तदभावीं आपलें राष्ट्र पंगू झालें आणि

पुढेंहि राहील म्हणून ते सतत खेद करीत. याहि शाखेंत प्रयत्न व्हावा म्हणून पुण्यांत भौतिक शास्त्रसंशोधक मंडळ स्थापण्यासाठीं पदरचे १०० रु. देऊन त्यांनीं येथील कांहीं भौतिक शास्त्रपंडितांकरवीं प्रयत्न केला. परंतु तो लौकरच गाभाटून राजवाडे यांस आपली रक्कम परत घ्यावी लागली. पुढें समाज-शास्त्र मंडळाची स्थापनाहि करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. परंतु मतविरोधाला बुजून त्यांनीं तो तसाच टाकला. नानातऱ्हेचीं मंडळें स्थापण्याची त्यांनीं अशी खटपट केली. पैकीं भा. इ. सं. मंडळ हें सुमारें पांच वर्षे स्वतः प्रमुखपणानें चालवून पुढें राजवाडे आपल्या स्वभास्वतंत्रतेला वश झाले. पण आपलें संशोधन कार्य पुढें ठीक चालले आहे हा भरंवसा त्यांना असे व कांहींसे तद्भूत समाधान त्यांचे अंतर्यामीं पुढेंहि असावें. बाकी इष्ट त्या वेगानें आणि क्षमतेनें आपले लोक कार्य करीत नाहींत म्हणून रागानें ते निरंतर धुमसत आणि हा क्रोध त्यांच्या प्रकृतीला मानवलेलाहि वारंवार दिसे.

'पुर्ते कोणाकडे पाहेना। पुर्ते कोणासी बोलेना। पुर्ते एके स्थळीं राहेना। उठोन जातो॥ जातें स्थळ तें सांगेना। सांगितलें तरी तेथें जायेना। आपुली स्थिति अनुमाना। येवोंची नेदी॥' ही समर्थांनीं वर्णिलेली निःस्पृहाची शिकवण राजवाडे यांचे चरित्रांत पदोपदीं प्रत्ययास येई. मात्र 'सगर लोकांचा जिव्हाळा। मोडूंच नये' हा शिकवणीचा उत्तरार्थ त्यांनीं गिरवावा तसा न गिरविल्यामुळें 'बहुतांचें मनोगत' हातीं घेण्याची महंती कला त्यांस साधली नाहीं आणि या दृष्टीनें त्यांच्या कार्याच्या उपेक्षेला ते स्वतः एक कारण झाले असें म्हटल्यावांचून राहावत नाहीं.

## एक महत्त्वाचें टिपण

इतिहासमंडळस्थापनेच्या आवश्यकतेचें प्रतिपादन राजवाडे यांनीं सहाव्या खंडाचे प्रस्तावनेचे अखेर शके १८२७ तच केलेलें आहे. राष्ट्रोदयांत पुन: त्याचा उच्चार केला आहे. अखेर प्रसिद्ध पंडित-प्रवर कै. गणपतराव जोशी यांस अध्यक्षस्थान देऊन भा. इ. सं. मंडळाची स्थापना राजवाडे व सरदार मेहेंदळे यांनीं शके १८३२ त केली. या सुमारास त्यांचे मनांत काय विचार घोळत होते तें दर्शविणारें एक टिपण मला उपलब्ध झालेलें आहे. ते आकारानें लहान परंतु आशयानें मोठें आहे. शके १८३१ सालीं राजवाडे यांनीं आपल्या वाढदिवशीं घेतलेल्या आपल्या आयुष्याचा आढावा या मोडी टिपणांत स्वहस्तें सहजगत्या त्यांनीं लिहून ठेवला आहे. त्यांत प्रथम शके १७८६ पासून १८३१ पर्यंत प्रत्येक साल लिहून त्याचेपुढें क्रमांक घालून मग मजकूर लिहिला आहे तो असा:—

'आषाढ शु. ८ स या विशाला (?) नवें ४६ वें वर्ष लागलें. ५४ राहिलीं त्यांत सर्व जगताला हितकारक व राष्ट्राला पोषक अशी कृति होवो. आजपर्यंत फक्त राष्ट्रीय स्मृति तयार करण्यांत काळ गेला. यापुढें कृति कृति कृति झाली पाहिजे. नाहींतर व्यर्थ! चाळीस वर्षें आणखी सतत मेहनत झाली पाहिजे. आरोग्य, उत्तम हवा, उत्तम पाणी, उत्तम जागा, उत्तम शुद्ध अन्न ही मिळालीं तर हेंहि होईल ईश्वराची कृपा अपरंपार हवी. टिपणाच्या दुसऱ्या बाजूस तपशील देऊन १८९४ पासून १९०९ जूनपर्यंत ७५०० पृष्ठें मजकूर जो आपण छापला त्याचा तपशील दिला आहे. या स्वत:साठीं एकांतांत लिहिलेल्या खासगी टिपणांत या थोर पुरुषाची तळमळ, उदारभाव आणि आशावाद हीं स्पष्ट प्रतिबिंबित झालीं आहेत. आपण शंभर वर्षें सहज जगूं, पन्नाशी उलटली तेव्हां आतां आपण तारुण्यांत

प्रविष्ट होत आहोंत इत्यादि विचार ते नेहमीं बोलून दाखवीत आणि दुसऱ्या रोगग्रस्त समव्यवसायिकांचा उपहास कठोर पणें करीत. ईश्वराची कृपा शके १८३१ त त्यांनीं भाकली. परंतु पुढें एक तपानें ईश्वर म्हणजे एक भ्रान्त कल्पना असा सिद्धान्त-हि त्यांनीं ठोकून दिलेला आढळतो! पण त्यांच्या मृत्यूनें काळाचा 'अजब तडाखा' आपणा सर्वांना सद्यः प्रतीत होत आहे. इतिहास-संशोधनाला हें वर्षच एकंदरीनें फार वाईट गेलें. खरेशास्त्री यांचे पश्चात् रा. ब. पारसनीस, विनायकराव भावे, अण्णा विजापूरकर आणि राजवाडे या इतक्या धुरंधरांचा बळी काळानें लागोपाठ घेतला. इतिहाससंशोधनाचें कार्य जरी दिवसेंदिवस जोरावत आहे तथापि या धुरीणांच्या मार्गदर्शित्वाची अद्यापि आवश्यकता होती.

आतां महाराष्ट्रावर मोठा भार पडला आहे. खरे, पारसनीस, राजवाडे ह्या इतिहास-संशोधन क्षेत्रांतील त्रिमूर्ति आपलें कर्तव्य करून कीर्ति कमावून स्वर्गीं गेल्या! त्यांनीं आपणामागें जें ऋण ठेविलें आहे तें फेडण्यासाठीं आपण कंबरा बांधल्या पाहिजेत. हें इतिहाससंशोधनाचें कार्य करमणुकीचें नाहीं, राष्ट्रोद्धाराचा आणि राष्ट्रसंवर्धनाचा हा पाया आहे, हें राजवाड्यांनीं आपल्या लेखणीनें आणि कृतीनें आज तीन तपांची तपश्चर्या करून सिद्ध करून दाखविलें आहे. ते म्हणतात:—( प्रस्तावना खंड ६ ) तात्विक हवेच्या संन्यासप्रवण व मांद्योत्पादक दाबाखालीं चिरडून गेल्यामुळें प्रपंचाची म्हणजे इतिहासाची हेळसांड करण्याकडे लोकांचा जो आत्मघाती कल आहे तो घालविण्यासाठीं इतिहासज्ञानप्रसाराची व तत्साधनप्रसिद्धीची आवश्यकता सध्यां विशेषच आहे असें माझें ठाम मत आहे. काल, देश व कल ह्या त्रिविध दृष्टीनें भारतवर्षाच्या व महाराष्ट्राच्या नानाविध चरित्राचा अफाट विस्तार पाहतां, आजपर्यंत

प्रसिद्ध झालेलीं साधनें जलाशयांतून एखाद्या वेडकानें मोठ्या प्रयासानें आपल्या क्षुद्र ओंजळींत वाहून आणलेल्या बिंदुप्रमाणें आहे. त्या बिंदुमात्रानें संन्यासप्रवणतेची मलिन पटलें धुवून जाणार कशीं? हें मालिन्य साफ नाहींसें करावयाला जलाशयांतून शेंकडों मोठमोठे पाट फोडून संन्यासप्रवणतेवर सतत सोडून दिले पाहिजेत. ही मारक संन्यास प्रवणता मोडून काढण्यासाठीं टिळकांनीं गीतारहस्य प्रगट करून कर्मयोगाचा डंका वाजविला आणि तेंच कार्य राष्ट्रीय स्मृतिजीवनानें राजवाडे यांनीं अन्य मार्गानें घडवून आणिलें. संशोधनार्थ विद्वान् निर्माण करणें आणि त्यांचीं व सहानुभाविकांचीं मंडळें स्थापण्याचें कार्य थोडेंफार झालें आहे. परंतु एवढ्यानें संपत नाहीं. राजवाडे म्हणतात:— (इति-ऐति) देशांत संशोधक मंडळें व संशोधक यांची संख्या वाढली म्हणजे पन्नास हिस्से फत्ते झाली. बाकी राहिलेलीं पन्नास हिस्से फत्ते एका बाबीवर अवलंबून आहे. ती बाब म्हणजे द्रव्यबल. त्यासाठीं देशांत "मायेचें व जिव्हाळ्याचें Home Rule होण्याची आवश्यकता नितांत भासमान होते." देशांत श्रीमान् आहेत, परिषदा आहेत. राजे आहेत परंतु "विद्यावृद्ध्यर्थ द्रव्य कां, कसें व कोठें खर्चावें हें समजण्याची अक्कल अद्याप लोकांना, राजांना, परिषदांना व सभांना फुटावयाची आहे. कबुतरें, वारवनिता, पहेलवान व तमाशेवाले यांची पारख धनिकांना होऊं शकते; विद्वान्, संशोधक व विचारद्रष्टे यांना ओळखण्याचीं इंद्रियें अद्याप राजांना व परिषदांना आलेलीं नाहींत, तीं आलीं म्हणजे वागीश्वरांची ओळख धनेश्वरांना पटून शास्त्रें, कला, ज्ञानप्रसार व विदग्ध वाङ्मय यांनीं ही भूमि फुलून जाईल." प्रस्तावना खंड ११ आणि प्रस्तावना खंड ६ मध्येंहि हेच विचार फारच तळमळीनें राजवाडे यांनीं लिहिले आहेत. आवश्यक द्रव्यसाहाय्य मिळण्याची परिस्थिती निर्माण होईपावेतों दारिद्र्य हेंच वैभव मानून चालणारे मेधावी

तरुण पुढें सरसावले पाहिजेत. त्यांची उणीव या त्यागी महाराष्ट्रांत पूर्वीं पडली नाहीं आणि पुढेंहि पडणार नाहीं. ‘ हें राज्य व्हावें हें श्रीच्या मनांत फार आहे, ह्या शब्दांनीं श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांनीं आपली श्रद्धा बोलून दाखविली. तशीच “ कर्ता करवितां स्वदेशांतील अभिमानी समाज आहे ’ ही राजवाडे यांची श्रद्धा होती. ती खरी करून दाखविणें सर्व महाराष्ट्राचें कर्तव्य आहे. राजवाडे यांचा वरील अफाट साधनसंग्रह ताबडतोब अदाह्य स्थळीं सुरक्षित ठेवण्याची तजवीज झाली पाहिजे. तसेंच जुन्या ज्ञानेश्वरीचा सार्थ नववा अध्याय, धातुकोश वगैरे त्यांचे अप्रसिद्ध लेख प्रसिद्ध करण्याची व्यवस्थाहि झाली पाहिजे. त्यांच्या संग्रहांतील निवडक सामुग्रीचे खंडहि प्रकाशित झाले पाहिजेत. त्यांच्या सर्व मुद्रित व अमुद्रित लेखांची एक नवीन आवृत्ति तज्ज्ञ संपादकाचे नजरेनें तयार होऊन प्रसिद्ध झाली पाहिजे. त्यांचा एखादा पुतळा तयार होऊन तो भा. इ. सं. मंडळासारख्या संस्थेंत ठेवून त्या मूर्तीचे सान्निध्यांत तरुण व होतकरु विद्वान् त्यांचा मार्ग स्वार्थत्यागानें चोखाळीत बसतील अशी त्यांच्या योगक्षेमाची सोयहि झाली पाहिजे. शुद्ध व शबल म्हणून ज्या चाळीस प्रकारच्या बाबींचा शोध व्हावा म्हणून राजवाडे यांनीं सुचविलें आहे. त्या सर्व शाखांचा अभ्यास नवीन तरुणांनीं राजवाड्यांचा आदर्श डोळ्यांपुढें ठेवून चालवावा आणि असा सर्वव्यापी प्रयत्न बराचसा आकारांत आल्यावर लोकोपयोगार्थ सकल – लोकव्यापार – वर्णनविवेचनात्मक असा महाराष्ट्राचा आणि शक्यतर भारतवर्षाचा सर्वांगसुंदर अनेक पर्वात्मक इतिहास रचावा म्हणजे या इतिहासाचें दिव्य अंजन डोळ्यांत पडून सर्व संन्यासप्रवणता खळखळून गळून जाईल आणि आपली दृष्टि तेजस्वी होऊन जसें तिला अंतःस्वरूप स्वच्छ दिसेल तसेंच तिला दूरदृष्टीनें बाहेरील संकटांची दीर्घ सूचना केल्यावरच

होईल. इतकेंच नव्हे तर तिच्या दिव्य दृष्टीपासून शेजारीपाजारी आपली कलुषित दृष्टि साफ करून घेतील आणि मानव समाजाची उन्नतीची कठीण चढण उत्साहानें चढतांना भारत आपलें पूर्वस्थान अलंकारील.

---

# १. डॉ. केतकर यांचें व्यक्तिमत्व

कुमारसंभवाच्या प्रारंभीं कालिदास महाकवीनें पाहिलाच श्लोक असा लिहिला आहे कीं, त्यावरून वस्तुगौरव एकदम मनावर ठसावें. हिंदुस्थानच्या उत्तरसीमेवर लांबच लांब आणि उंचच उंच असा पसरलेला तो हिमालय हें कालिदासाच्या प्रकृत काव्यवस्तूचें क्षेत्र,

"अस्त्युत्तरस्यां दिशि देवतात्मा हिमालयो नाम नगाधिराजः।
पूर्वापरौ तोयनिधीऽवगाह्य स्थितः पृथिव्या इव मानदण्डः॥ १॥

अशा उठावदार शब्दांनीं प्रथमारंभींच त्यानें वर्णिलें आहे. पृथ्वीचा 'मानदण्ड' असा तो प्रचंड हिमालय!

आणि अशाच भव्य गौरवाच्या कल्पना कै. डॉ. श्री. व्यं. केतकर यांचें नांव निघतांच मनांत उभ्या राहतात! मराठी वाङ्मयक्षेत्राच्या उत्तरभागीं तेवीस शिखरांचा तो प्रचंड 'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' आपल्या प्राचंड्यानें व वैभवानें हिमालयासारखाच शोभत नाहीं काय? त्या ज्ञानकोश खंडांनीं मराठी वाङ्मयाचें महत्त्व व वजन कितीतरी वाढविलें बरें?

प्राचंडय हें केतकरांचें वैशिष्ट्य याप्रमाणें प्रथमदर्शनींच मनांत भरतें. या ज्ञानकोशाची कल्पना जेव्हां केतकरांनीं पुढें मांडली त्या वेळीं समस्त महाराष्ट्रमंडळ अगदीं स्तिमित होऊन गेलें. लाखांनीं भांडवल जमविण्याच्या आणि हजारांनीं गिऱ्हाईक मिळविण्याच्या

त्यांच्या त्या योजना ऐकून आपण काय ऐकत आहों तरी काय? अशी शंका येऊन मन आश्चर्यमग्न होऊन जाई!

योजनेचें प्राचंड्य हा एकच विशेष वर सांगितला; परंतु या विशेषाशीं असेंच दुसरेंहि विशेष संलग्न होते आणि या संयोगामुळें वाटणाऱ्या आश्चर्यांत भर पडे. ज्ञानकोश रचावयाचा तो **मराठींत** रचावयाचा, हा केतकरांचा निश्चय या संलग्न विशेषांपैकींच एक होय. मराठी माणसानें मराठींत ग्रंथ रचणें यांत विशेष तें काय? पण स्वभाषेंत ग्रंथरचना करणें हें केतकरांच्या काळींहि विशेष असें गणलें जाण्याजोगेंच होतें. एखादा लहानसा ग्रंथ असला तर गोष्ट वेगळी; परंतु एवढी ज्ञानकोशासारखी अवाढव्य रचना मराठींत करण्याची कल्पना धाडसाची व अपूर्व खरीच! तिसरा विशेष असा कीं, ही अशी कल्पना करणारे गृहस्थ हे कोणी इकडील स्वदेशी संप्रदायाचे वारें अंगांत शिरलेले देशभक्त नसून पाश्चात्य देशांत विद्याभ्यासासाठीं जाऊन श्रेष्ठ पदवी प्राप्त करून घेऊन आलेले एक इंग्रजी विद्वान्! अशांनीं इंग्रजींत लिहावें व विद्वान् म्हणून आपल्या अज्ञ देशबांधवांसमोर मिरवावें कीं मराठींत ज्ञानकोश-रचनेच्या गोष्टी बोलाव्या?

अमेरिकेंत जाण्यापूर्वी केतकर 'महाराष्ट्र–वाग्विलास' मासिक काढीत असत. तो त्यांचा मराठीचा ळळा हा एक तरुणपणाचा झटका न ठरतां, अमेरिकेंतून परत आल्यावर त्या मूळच्या मराठीच्या अभिमानांकुराला चांगलीच बहारदार पालवी फुटलेली पाहून आश्चर्य वाटे! अस्सल 'इंग्रजी' विद्वता अंगीं बाणलेल्या कित्येक वीरांनीं केतकरांची पद्धति 'अमेरिकन' हें कळतांच 'तरीच' म्हणून गालांतल्या गालांत हंसून त्यांच्या मराठी बाण्याची संभावना केल्याशिवाय मात्र सोडलें नाहीं ही गोष्ट निराळी! परंतु इतक्यानेंच केतकरांचें वैशिष्ट्य संपलें नाहीं, एवढी प्रचंड योजना सिद्धीस कशी

जावयाची? 'चिपळूणकर आणि मंडळी' यांनीं लोकप्रिय अशा महाभारतासारख्या ग्रंथाचें सुलभ मराठींत भाषांतर प्रसिद्ध करण्याचें जें कार्य हातीं घेतलें होतें तेंच काय तें ज्ञानकोशापूर्वीचें मराठींतील प्रचंड वर्गांत पडणारें कार्य, आणि म्हणूनच पेशवाई गेल्यानंतर एवढें प्रचंड कार्य झालें नाहीं असे उद्गार या भाषांतर कार्याबद्दल डॉ. भांडारकरांनीं सुद्धां काढले होते! सुमारें आठ वर्षांत हें भारत भाषांतर पुरें झालें, पाऊण लक्ष रुपये खर्च त्याला आला, आणि अनेक राजे-महाराजे यांच्याकडे रा. बाळशास्त्री ठकार यांना पायपीट करावी लागली, तेव्हां कोठें तें कार्य तडीस गेलें! हें महाभारताचें कार्य निघालें त्या वेळींच केतकरांचा 'महाराष्ट्र-वाग्विलास' सुरू झाला, आणि महाभारताचें कार्य समाप्त होण्याच्या सुमारास केतकर अमेरिकेंतून स्वदेशीं परत आले; आणि थोड्याच दिवसांत आपल्या प्रचंड कल्पना मोठ्या आत्मविश्वासानें लोकांपुढें मांडूं लागले! चिपळूणकर-मंडळीचा व्यवहार पाऊण लाखाचा, तर केतकरांचा सवाल तीन चार लाखांचा! चिपळूणकर-मंडळीचा भर राजाश्रयावर विशेष, तर केतकर राजामहाराजांच्या नादीं न लागावें अशा मताचे! चिपळूणकर-मंडळी यांत 'मंडळी' हा नुसता शब्दच तेवढा राहिलेला; उलट केतकर लिमिटेड कंपनीची कल्पना घेऊन पुढें सरसावलेले! चिपळूणकर-मंडळीच्या कामापेक्षां केतकर पुढें आलेल्या काळीं समाजाचें पाऊल पुष्कळ झपाट्यानें पुढें गेलें होतें. स्वदेशी स्वराज्याच्या चळवळीनें सारा देश आंदोलित झाला होता. पण पुढें सरकारी दडपशाहीमुळें लोकांत एक प्रकारची भयभिन्न स्तब्धता पसरली होती. तथापि लवकरच महायुद्ध उभें राहून 'होमरूलच्या' गर्जनेनें देश पुनः चैतन्योद्भावित होऊं लागला होता. अशा वेळीं केतकर आपली ज्ञानकोश-योजना समाजापुढें मांडीत

होते तरीहि त्या योजनेचा प्रचंडपणा पाहून श्रोते थक्क होते! कित्येकांस वाटे हें एक खूळ आहे. "बोलेल बोलेल आणि गप्प बसेल केतकर!" पण पुढें केतकरांच्या अंगचा चिवटपणा जेव्हां दिसूं लागला व ज्ञानकोश-योजना सिद्धीस गेली तेव्हां सारेच लोक म्हणाले कीं, "केतकर म्हणजे सामान्य प्रकरण नाहीं!"

'प्राचंड्य' हा ज्ञानकोश-योजनेचा प्रथम विशेष वर निर्देशिला; परंतु तेवढ्यानें त्याची पाहिजे तशी स्पष्टता होत नाहीं. नुसतें 'एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका' चें भाषांतर कोणी केलें असतें तरी तो ग्रंथ 'प्रचंड' या संज्ञेस पात्र झाला असता. पण केतकरांच्या मनासमोर विशेष अशी एक दृष्टि होती. कांहीं एक स्पष्ट तत्त्व व धोरण ठरवून त्यांनीं आपला उद्योग आरंभिला होता. 'एन्. ब्रिट' ची नुसती मराठी नक्कल त्यांस उठवावयाची नव्हती. "हे काय करणार, इंग्रजी एन्सायक्लोपीडियाचें भाषांतरच ना?" असा अज्ञानी उपहासहि त्यांचा कोठें कोठें होई. परंतु महाराष्ट्राची विशेष गरज लक्षांत घेऊन आपण आपला 'ज्ञानकोश' रचणार ही केतकरांची भूमिका होती. उदाहरणार्थ इंग्रजी एन्सायक्लोपीडियांत जर इंग्रज व्यक्ति, समाज व इतिहास यांचा विस्तार असेल आणि महाराष्ट्रीय व्यक्ति, समाज व इतिहास यांच्याबद्दल कांहीं मजकूर नसेल तर आपण या **विषयांचा** विस्तार करून त्यासाठीं अधिक पृष्ठें खर्चीं घालूं आणि इंग्रजी व युरोपीय घटनांचा अनावश्यक विस्तार टाळून त्यांस संक्षेप देऊं असें केतकरांचें धोरण होतें. अर्थात् जगांतील ज्ञानाची मांडणी महाराष्ट्रीय समाजाच्या उपयोगासाठीं जशी पाहिजे तशी विचारपूर्वक करणें हें त्यांचें धोरण होतें, नुसतें भाषांतर करणें हें नव्हतें. केतकरांच्या मनो-भूमिकेचा व व्यक्तिमत्वाचा हा एक लक्षणीय विशेष म्हटला पाहिजे.

महाराष्टाची विशेष गरज लक्षांत घेणें या हेतंतच महाराष्टीयांच्या

उन्नतीविषयींची केतकरांची पोटतिडीक दिसून येते. महाराष्ट्राची उन्नति करावयाची तर मराठी भाषेचें सर्वमहाराष्ट्र-साधारण बंधन सडकून प्रभावी केलें पाहिजे हा केतकरांनीं अंगिकारिलेला महासिद्धान्तहि विचारांत घ्यावा लागतो. त्यांच्या सर्व खटाटोपाचें मूळ या महासिद्धान्तांत आढळून येतें. मराठी भाषेचें सामर्थ्य वाढविणें म्हणजे महाराष्ट्राचें सामर्थ्य वाढविणें होय, हें समीकरण केतकरांस मान्य होतें. सर्व महाराष्ट्रीय जनता सुबुद्ध करण्याचें एक बलिष्ठ साधन म्हणूनच त्यांनीं ज्ञानकोशाचें प्रभावी शस्त्र निर्माण करण्याचा उद्योग अंगिकारिला होता. यालाच 'केतकरांचा मराठी बाणा' असें यथार्थपणें म्हणता येईल व हा बाणा त्यांच्या सर्व हालचालींत अनुस्यूत असलेला दिसून येतो. किंबहुना तो त्यांच्या व्यक्तिमत्वाचें विशेष लक्षण समजण्यास चिंता नाहीं.

ज्या जनतेसाठीं ज्ञानकोशाचें प्रभावी साधन निर्माण करण्याचा महदुद्योग केतकरांनीं अंगिकारला ती जनता हाच आपला मुख्य आधार होय, हें त्यांचें दुसरें एक जीवनसूत्र होतें. लिमिटेड कंपनीचा मार्ग या ज्ञानक्षेत्रांत यशस्वीपणें चोखाळून दाखविण्याचा केतकरांनीं निर्धार केला तो यामुळेंच. यांत त्यांची कल्पकता तर दिसून येतेच, पण त्याबरोबरच जनतेवरील अखंड विश्वासहि दिसून येतो. 'लिमिटेड परंतु लोकाश्रित' व्हावें व रहावें हाच त्यांचा संकल्प होता.

तात्पर्य 'प्राचंड्य' 'मराठी बाणा' आणि 'लोकाश्रय, लिमिटेड' असे त्यांच्या कार्याचे तीन विशेष सांगतां येतात. आज यांतच केतकरांचें लोकविलक्षण कर्तृत्व व व्यक्तिमत्व उत्तमरीत्या प्रतिबिंबित झालेलें दिसतें.

केतकर अमेरिकेंतून हिंदुस्थानांत उतरले तोंच त्यांचे नानाविध विशेष व व्यक्तिमत्व हें लोकांच्या चांगलेंच नजरेंत भरत गेलें. वास्त-

विक परदेशी पदवी मिळविलेला तरुण म्हणजे इंग्रजीच्या आश्रयानें चालणारा व पाश्चात्य पोशाखांत वावरणारा असा असावयाचा. परंतु केतकरी खाक्या पहावा तो औरच! सुटाबुटाऐवजीं बंदांचा अंगरखा घालून आणि डोकीवर झिळमिळ्यांची महाराष्ट्रीय पगडी चढवून आपलें नागपुरी रुइफूल कांठी उपरणें सांवरीत, आणि पायांत पुणेरी दाक्षिणी जोडा घालून केतकर आपल्या अभिनव कल्पना व प्रचंड योजना मराठींत बोलूं लागले. तेव्हांच लोकांना वाटलें कीं, "हें कांहीं निराळेंच प्रकरण आहे!" केतकरांच्या व्यक्तिमत्वाचेंच हें एक बाह्य दर्शन होतें.

वऱ्हाड–मध्यप्रांतांतील विषम जमाखर्चाची छाननी नागपुरांत करून त्यांनीं आपला पहिला पराक्रम गाजविला आणि "केतकर म्हणजे विचारांची खळबळ" हें सूत्र जनतेच्या मनांत भरविलें! "आश्चर्य-वत्पश्यति कश्चिदेनम्। आश्चर्यवत् वदति तथैव चान्यः।" अशी केत-करांस पाहून सर्वांची अवस्था झाली! केतकरांनीं कांहीं काळ हिंदु-स्थानांत परिभ्रमण केलें व अनुभव घेऊन विचारपूर्वक आपलें कार्यक्षेत्र निश्चित केलें. पाश्चात्य-पदवी-पंडित म्हणजे सुखांत व ऐटींत कोठेंतरी मोठी नोकरी करून कालक्रमणा करणारा प्राणी हा समज त्यांनीं उलथून पाडला. पूर्वीं रँग्लर परांजपे यांनीं असाच निश्चय दाखविला, परंतु त्या वेळीं ना. गोखलेप्रभृति परांजप्यांच्या गुरूंनीं त्यांस प्रतिज्ञामुक्त करून सरकारी नोकरीची वाट मोकळी करून दिली होती–म्हणजे पुढाऱ्यांस कांहीं त्या वेळीं परांजपे यांस राष्ट्सेवेंत गुंतवून ठेवण्याचा धीर झाला नाहीं! परांजपे यांनीं निराळेंच तेज दाखविलें ही गोष्ट वेगळी. आपणांस त्या उदा-हरणावरून आपल्या मोठमोठ्या पुढाऱ्यांची मानसिक रचना कितपत दृढ होती त्याचा अंदाज घेतां येतो. केतकर तर परांजप्यांच्याहि पुढें

गेले! कोठेंतरी मानाची एखादी नोकरी शोधावी, जनतेपासून दूर राहावें, सुखानें संसार करावा व शेवटीं एखादा बंगला बांधून आपली आयुर्यात्रा पुरी करावी, हा क्षुण्ण मार्ग केतकरांनीं अनुसरला नाहीं, तर अगदीं नवाच मार्ग त्यांनीं शोधून काढिला. यांतच त्यांच्या व्यक्तिमत्वाची थोरवी आपणांस सांपडेल.

केतकर नुसते संस्थापक किंवा संयोजकच नव्हते तर स्वतः प्रकांड पंडित होते! समाजशास्त्राचा त्यांचा अभ्यास मोठा होता. इतरहि अनेकविध विषयांवर त्यांचा सतत व्यासंग चालू असे. सतेज विद्यासाधनाला जी एक दिव्य दृष्टि लागते ती त्यांनीं सिद्ध करून घेतली होती. उत्कृष्ट बुद्धिमत्ता, दृढ परिश्रम आणि शास्त्रीय पद्धति या त्रिविध बलांनीं केतकर संपन्न असल्यामुळें त्यांची छाप साहजिकच कोठेंहि पडत असे. ते सदा विद्यार्थी होते. त्यांचा अभ्यास केव्हांच सुटला नव्हता. असा हा अनेकांगी विद्वान् ज्ञानकोश रूपानें समाजकार्य करण्यास आखाड्यांत उतरला. विद्वानांस आपली विचारसरणी समजावून सांगण्याकरितां त्यांनीं कांहीं संस्कृत सूत्रें रचिलीं होतीं. केतकर कांहीं वक्ते नव्हते. किंबहुना बोलण्यानें छाप पाडण्याची कला त्यांच्या अंगीं नव्हतीच म्हटलें तरी चालेल. परंतु बोलल्याशिवाय तर त्यांचें कार्य चालणेंच शक्य नव्हतें. त्यांच्या बोलण्यांत कला जरी नव्हती तरी एक मात्र विशेष असा असे कीं, चारदोन शब्दांतच एखादा अभिनव सिद्धान्त सांगून श्रोत्यांवर ते सहज छाप पाडीत! 'ज्ञानकोश' रचण्यास पुढें सरसावलेला हा पंडित स्वतःच चालताबोलता ज्ञानकोश आहे याचा कोणासहि प्रत्यय येई. चावी उघडली कीं जसें पाणी चालू होतें, तसें केतकरांनीं बोलण्यास तोंड उघडलें कीं, विविध विषयांवरील ज्ञानगंगा सतत वाहत राही. या तयारीमुळें अंगावर घेतलेलें अवघड व अवजड कार्य सहज वाहून नेण्याचें

सामर्थ्य या पुरुषांत खचित् आहे, असा प्रत्यय लोकांस आल्यावाचून राहत नसे.

योजिलेल्या कार्याची पूर्वतयारी देशांत तर कांहींच सिद्ध नव्हती. 'संन्याशाच्या मुंजीला शेंडीपासून तयारी' म्हणतात तशांतला सारा प्रकार होता. (१) लोकांत गरज व आवड उत्पन्न करणें, (२) लोकांना योजनेचें महत्त्व पटवून देणें, (३) योजनेस लागणारें प्रचंड भांडवल जमविणें, (४) अनेकविध लेखकवर्ग जुळविणें, (५) मुद्रणाची सोय करणें, (६) संदर्भग्रंथ जमा करणें, (७) हिशेब व व्यवस्था—खातें चालविणें, इत्यादि सर्वच नवी सृष्टि केतकरांस उभारावयाची होती. मोठी हिंमत अंगीं असल्याशिवाय ही सृष्टि उभी करणें शक्य नव्हतें. ती हिंमत केतकरांनीं धरली आणि सर्व उभारणी केली. केतकरांनीं स्वतःच ज्ञानकोशमंडळाच्या कार्याचा इतिहास प्रसिद्ध केला आहे. तो केतकरांची बाजू सांगणारा असला, तरी सामान्य वाचकाला मोठा उद्बोधक झाला आहे यांत शंका नाहीं. महाराष्ट्रांतील आधुनिक काळांतील एका मोठ्या घडामोडीचा तो इतिहास आहे. प्रत्येक कार्यकर्त्या व्यक्तीनें त्याचें वाचन करणें अगत्याचें आहे. श्री. दाते, कर्वे यांच्यासारखे तरुण पदवीधर केतकरांनीं मिळविले आणि या पदवीधरांना या कार्याच्या प्रसंगानें उत्तम शिक्षण मिळून आतां स्वतंत्रपणें त्यांनीं 'महाराष्ट्र शब्दकोशा'चें मोठें कार्य यशस्वी रीतीनें संपवीत आणिलें आहे. 'प्राचीन चरित्र कोशा'चे कर्ते श्री. चित्रावशास्त्री यांनाहि कोशकार्याची दीक्षा केतकरांनींच दिली म्हणावयास चिंता नाहीं. श्रौताचार्य बापटशास्त्री यांसहि येथेंच नवीन दृष्टि प्राप्त झाली. किंबहुना ज्ञानकोशाच्या स्फूर्तिदायक उदाहरणामुळें महाराष्ट्रांत 'नवें कोशयुग' निर्माण झालें. ही कामगिरी अजरामर होऊन राहील यांत शंका नाहीं. 'धर्मकोश', 'व्यायामकोश', 'व्यावहारिक

ज्ञानकोश ' इत्यादि अनेक मोठ्या योजना सांप्रत महाराष्ट्रासमोर आहेत. केतकरांचें उदाहरण प्रत्यक्षरीत्या या सर्वांस प्रोत्साहक व मार्गदर्शक झालें आहे, असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति खचित् नाहीं.

' ज्ञानकोश ' संपूर्ण सिद्धीला जाईल किंवा नाहीं याची पुष्कळ शंका होती. लोकांच्या मनांतील हा अविश्वास केतकरांनीं समूळ उपटून काढला. ज्ञानकोश-संघटना करतांना केतकरांनीं ज्या कंपनीपद्धतीचा आश्रय केला ती आमच्याकडे अभिनव होती. यापूर्वी मोठालीं विद्याकार्यें महाराष्ट्रांत झालीं त्यांचा मुख्य भर स्वार्थत्यागावर होता. डे. ए. सोसायटी आणि तदनुयायी संस्था या महाराष्ट्रापुढें आदर्श म्हणून उभ्या होत्या. मागें रँग्लर परांजपे यांच्या स्वार्थत्यागाचें उदाहरण दिलेंच आहे; परंतु केतकरांनीं त्या स्वार्थत्यागाची मीमांसा आपल्या मतानें 'लोकशिक्षण' मासिकांतच करून मोठी खळबळ उडवून दिली ! केतकरांचीं मतें जरी पुष्कळ वेळां पटत नसत, तरी त्यांच्या युक्तिवादांत नेहमीं एक नवीनपणा असे. जुन्या खासगी संस्था काढून मऊ लोकांच्या दयेचा गैरफायदा घ्यावा व त्यामुळें सरकारास आपली जबाबदारी टाळण्यास उत्तेजन द्यावें, हें त्यांस पसंत नव्हतें. अर्थात् हा त्यांचा विचार एकांगी म्हटला तरी युक्तिवाद अभिनव व विचारप्रवर्तक आहे. ज्ञानकोश-योजनेची उभारणी महाराष्ट्रांतील परंपरागत स्वार्थत्यागाच्या भूमिकेवरून करण्यांत आलेली नाहीं. लोकांची गरज पुरविणारा धंदा म्हणून हा उद्योग आपण करितों, असें केतकर अभिमानानें म्हणत. या धंद्यासाठीं भाग खपवून द्रव्य जमवावें, त्यांतून पगारी पंडित ठेवून काम करून घ्यावें, आपणहि शक्य तर मोठा पगार घ्यावा, आणि सुटल्यास भागीदारांस नफा वांटावा, या धोरणानें ' ज्ञानकोश–मंडळ लिमिटेड ' स्थापण्यांत आलें म्हणून केतकरांनीं या कामासाठीं देणग्या घेतल्या नाहींत. 'मदत करावयाची तर भाग घ्या', असें ते म्हणत.

भागांच्या रकमांचा भरणा न केल्यास कायद्याची धमकी देण्यास ते भीत नसत. स्वत: त्यांनीं दरमहा सुमारें ४०० रुपये वेतनहि कांहीं वर्षे तरी घेतलेलें आहे. तथापि पुढें पुढें केतकरांच्या अनुभवाला आलेंच असलें पाहिजे कीं, लोक भाग घेत ते धंद्यांत भांडवल घालावयाचें म्हणून नव्हे, लोक कमी पगार घेऊन काम करीत ते पुढें कंपनीला पुष्कळ फायदा मिळेल या आशेनें नव्हे, आणि स्वत: केतकरहि इतर उद्योगांत आपल्या योग्यतेच्या मानानें मिळाला असता इतका पगार न घेतां जें काम करीत तें सर्व कांहीं ते कधीं कधीं म्हणत त्याप्रमाणें केवळ धंद्याच्या व्यावहारिक दृष्टीनें नव्हे; तर आपण भाषाद्वारा जनसेवेचें जें एक पवित्र व प्रचंड कार्य चालविलें आहे त्याच्या यश:सिद्धीवरील निष्ठेमुळेंच होय यांत शंका नाहीं. असो. केतकरांची 'लिमिटेड मंडळी'ची कल्पना एकंदरींत वाङ्मय–क्षेत्रांत नवी होती आणि ती त्यांनीं शेवटास नेऊन एक नवीन मार्ग दाखवून दिला, एवढी गोष्ट केव्हांहि मान्य करण्यासारखी आहे. मग त्यांची स्वार्थत्यागाची मीमांसा कांहींहि असो. केतकरांच्या व्यक्तिमत्वांतील जोरकसपणा व कल्पकता यांचा पुरावा या योजनेंत सांपडतो.

ज्ञानकोशाला जे पांच प्रस्तावना खंड केतकरांनीं जोडले त्याचें महत्त्व मराठी भाषेंत अतिशय आहे. इतकी विविध माहिती व इतके मौलिक विचार मराठींतच काय, परंतु अन्य भाषेंतील कोणत्याहि ग्रंथांत क्वचित्च सांपडतील. हे पांचहि खंड संपूर्ण जो अभ्यासील तो खचित् विद्वान् होईल, त्याची दृष्टि विशाल होईल आणि त्याचीं मतें व विचार थोडे तरी बदलतील. जर देशांत देशी विद्यापीठ असतें किंवा जीं अन्य आहेत त्यांस या ग्रंथाची किंमत कळली, तर प्रस्तुत ग्रंथाची महति पुष्कळच वाढली असती. परंतु अद्यापि आमच्या दृष्टी-

वरील झांपड उठली नाहीं व यामुळें हा महाग्रंथ केतकरांनीं आमच्या-साठीं तयार केला खरा; परंतु तो थोडेच लोक वाचतात! या ग्रंथाच्या वाचनाची गोडी लागावी म्हणून ज्ञानकोश मंडळाकडून केतकरांनीं परीक्षा घेण्याची टूम देखील एकदां काढली होती; परंतु तो उपक्रम पुढें चालला नाहीं. येथें अशी कल्पना मनांत येते कीं, या पांचहि खंडांतील ज्ञान विभागून त्याच्या आधारें लहान लहान ग्रंथ जर रचण्यांत येतील तर त्यांचा प्रसार चांगला होईल आणि हे ग्रंथ तयार करणाऱ्याचा उद्देश अधिक सफल होईल.

केतकरांच्या व्यक्तिमत्वाचा अभ्यास करतांना त्यांच्या विचार-संपत्तीचें महत्त्व विशेष काळजीपूर्वक लक्षांत घेतलें पाहिजे. पुष्कळ लोक केतकरांस विक्षिप्त म्हणून समजत. एका प्रकारें केतकरांचा हा गौरवच समजण्यास हरकत नाहीं. परंतु अशा विचारांत लोकांचेंच नुकसान अधिक आहे. केतकरांचे पुष्कळ विचार व मतें लोक-विलक्षण होतीं यांत शंका नाहीं. त्यांतील कांहीं चुकीचींहि असतील-आणि कांहीं पुढें चुकीचीं ठरतीलहि. परंतु हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं, सूक्ष्म विचारांनीं त्यांनीं समाजाच्या विचारसंपत्तींत अत्यंत मूल्य-वान् भर टाकिली आहे. नुसता ज्ञानसंग्रह करून जनतेची सेवा त्यांनीं केली, एवढाच भाग त्यांच्या कर्तृत्वाचा नाहीं; तर त्यांनीं आपल्या परिपक्क बुद्धीनें जगाच्या इतिहासाचें व समाजस्थितीचें जें निरीक्षण व परीक्षण केलें, आणि त्यांच्या आधारें जे सिद्धान्त व जीं अनुमानें प्रकट केलीं त्यांचें महत्त्व लोकांस अद्यापि कळलेलें नाहीं. त्यांच्या विविध आणि विस्तृत अशा लेखनांत आपणांस त्यांचे अनेक अभिनव विचार आढळतील. आज ते विचार यावे तसे पुढें आलेले नाहींत, परंतु अभ्यासपूर्वक विचार करण्याची संवय आपणांला जेव्हां लागेल तेव्हांच केतकरांच्या व्यक्तिमत्वाचें खरें ज्ञान आपणांस होईल,

उदाहरणार्थ, चातुर्वर्ण्य संरक्षणाचे केतकर पुरस्कर्ते होते, हें वाचून आपणांस पुष्कळ विस्मय वाटतो. परंतु केतकरांची चातुर्वर्ण्य कल्पना काय होती याचा आपण क्वचित् विचार करतों. या दृष्टीनें केतकरांच्या 'ज्ञानकोश-प्रस्तावना-खंडां'चा चांगला अभ्यास झाला पाहिजे. केतकर विद्यमान असतांनाच त्यांच्या विचारांचा व सिद्धान्तांचा कसून अभ्यास करून चर्चा करावयास पाहिजे होती. त्यांच्याशींच चर्चा करण्याचें भाग्य आतां दुर्दैवानें आपणांस लाभणार नाहीं. आतां त्यांचें ग्रंथ व लिखाण मागें आहे. त्यांच्यावरच आपणांस हें काम भागविलें पाहिजे. सांप्रत अनेक तात्कालिक प्रश्न आपल्यासमोर उभे राहत आहेत आणि त्यांचा तात्पुरत्या दृष्टीनें किंवा क्वचित् एखाद्या विशिष्ट 'सांप्रदायिक' दृष्टीनें विचार हल्लीं होत असलेला दिसतो. परंतु कसलाहि पूर्वग्रह मनांत न ठेवतां शुद्ध बुद्धिवादाच्या दृष्टीनें केतकरांच्या मतांचा विचार झाला पाहिजे. असा विचार व चर्चा हीं आपणांस आपलीं मतें निश्चित करण्यास आणि आपलें कार्यमार्ग आखण्यास फार उपयोगी पडतील.

मागें म्हटलेंच आहे कीं, केतकर नुसते संयोजक किंवा संग्राहक नव्हते, तर ते एक विचारप्रवर्तकहि होते. त्यांच्या संयोजकतेचें व संग्राहकतेचें कांहीं अनुकरण महाराष्ट्रांत झालें, परंतु त्यांचें विचार-प्रवर्तन मात्र केवळ त्यांच्यापुरतेंच मर्यादित होऊन राहिलें. कोशयुगाचे संस्थापक किंवा प्रवर्तक म्हणून महाराष्ट्र केतकरांना ओळखितो; परंतु त्या केतकरांनीं, नुसता 'ज्ञानकोश' रचिला नाहीं, त्या ज्ञानकोशाला त्यांनीं 'विचारकोश' जोडलेला आहे आणि तिकडे कोणी द्यावें तसें लक्ष दिलेलें नाहीं. केतकरांचा हा 'विचारकोश' म्हणजे एक अनर्घ्य रत्नभांडार आहे. सुंदर भाषेच्या कोंदणांत हीं विचाररत्नें बसविलेलीं नसलीं म्हणून त्यास

मोठेंसें वैगुण्य प्राप्त होतें असें नाहीं. केतकर समाजशास्त्री होते आणि समाजशास्त्राच्या अध्ययनाचें महत्त्व फार मोठें आहे. विशेषत: हिंदु-स्थानसारख्या अफाट व भिन्न समाजसंकुल देशांत तर समाजशास्त्राचें महत्त्व पराकाष्टेचें आहे. परंतु या शास्त्राचा अभ्यास येथें अत्यल्प होतो. युरोपीय पंडितांचे उष्टे विचार चघळणारेच आपणांत पुष्कळ! स्वतंत्र प्रज्ञेची येथें अत्यंत वाण आहे. तथापि केवळ स्वतंत्र प्रज्ञा असूनहि आपलें भागणार नाहीं. शास्त्रीय पद्धतीची प्रज्ञेइतकीच आवश्यकता आहे. आपल्या समाजाचा शास्त्रीय अभ्यास आपल्याच पंडितांनीं केला पाहिजे. अशा अभ्यासाच्या अभावीं आम्ही व आमचे पुढारी अनेक अपसिद्धान्त व कच्च्या कल्पना उराशीं बाळगीत आहों आणि त्यांच्या कोलाहलांत भलतीकडेच भरकटत आहों. समाज-शास्त्राचें पद्धतशीर अध्ययन--अध्यापन मराठींत होईल तो सुदिन. परंतु केतकरांनीं मराठींत त्याची एवढी जाडी पूर्वतयारी करून ठेव-लेली आहे कीं, त्यांचें नांव विख्यात महाराष्ट्रीय समाजशास्त्रविशारद म्हणून पुष्कळ वर्षे टिकेल. शास्त्रीय विचारसंपत्ति टिकाऊ असते आणि राजचे विचार तसे नसतात. त्यांत टाकाऊच फार. टाकाऊपेक्षां टिकाऊ विचारसंपत्तीचा संग्रह आपण आस्थेनें केला पाहिजे. ठिक-ठिकाणीं अभ्यासमंडळें स्थापून केतकरादि समाजशास्त्री पंडितांच्या विचारांची सप्रमाण चर्चा झाली पाहिजे. म्हणजे 'माझें असें ठाम मत आहे कीं,' हें वाक्य उच्चारण्याला खरोखर काय अधिकार लागतो याची चांगली कल्पना येईल. एरवीं आपण रोज हें वाक्य सर्व तिवाठ्याचवाठ्यांवरून ऐकतच असतों आणि मनांत हंसतच असतों!

राजकीय, आर्थिक, धार्मिक, ऐतिहासिक अशा सर्व विषयांची चिकित्सा समाजशास्त्र्याला करावी लागते; त्यामुळें एक प्रकारची दृष्टीची व्यापकता त्याला सहज प्राप्त होते. शिवाय एकशास्त्र पंडितां-

चा एकांगीपणा या व्यापकतेनें दूर होतो. यासाठीं समाजशास्त्रीय पंडितांची आपणांस फार गरज आहे. प्रचलित प्रश्नांकडे समाजशास्त्रीय पद्धतीनें पाहण्यास आपणांस शिकलें पाहिजे. केतकर जेव्हां अशा प्रश्नांवर बोलत तेव्हां त्यांचें बोलणें पुष्कळदां विक्षिप्तपणाचें वाटे. परंतु ती केतकरांची थोडी खोड होती. कारण, ते स्वभावानें गमती पण खोडकर असत. जरासें पुढें जाऊन जेव्हां ते आपल्या मताचें विशदीकरण करीत, तेव्हां त्यांच्या चौकस व चिकित्सक बुद्धीची चमक चांगलीच समजून येई.

त्यांचें राजकीय प्रश्नांचेंहि ज्ञान खोल असून मांडणी पुष्कळ अभिनव असे. मागें 'लोकशिक्षणां'त त्यांचे राजकीय विषयावर कांहीं लेख आले तेव्हां त्या तोलाचें राजकीय लिखाण मराठींत त्या पूर्वी कोणी लिहिलेलें नव्हतें इतकी मान्यता त्यांचीं मतें न पटणाऱ्यासहि द्यावी लागे, असा त्यांच्या विचारांचा बळकटपणा होता.

केतकरांची खेळाडू वृत्ति ही त्यांच्या मतांची उपेक्षा होण्यास थोड्याफार अंशानें कारण झालेली आहे. ते गंभीरपणानें बोलत असतील अशी खात्री त्यामुळें वाटत नसे. 'दिला एक बार उडवून, पाहूं या गंमत!' अशासारखी त्यांची वृत्ति अनेक वेळां दिसून येई. याशिवाय आपलें मत मांडतांना ते पुष्कळदां वृत्तिविवश होत असत. अमके 'चोर' आहेत, अशी भाषा ते जेव्हां वापरीत तेव्हां शास्त्रीय पंडितास अवश्य असलेलें गांभीर्य त्यांनीं सोडलें, असें प्रथमदर्शनीं कोणास वाटल्यास तो त्याचा दोष नव्हे. 'पुणें—समाचार', 'पन्नास वर्षांनंतरचें पुणें' इत्यादि अनेक उपक्रम हातीं घेऊन त्यांना त्यांत यश मिळालें नाहीं, याला त्यांचा स्वभावदोष कांहीं अंशानें तरी कारणीभूत झाला यांत संशय नाहीं.

**असतील कांहींसे विक्षिप्त, पण म्हणून त्यांच्या पांडित्याकडे व**

प्रतिभोज्वलित विचारांकडे दुर्लक्ष करणें शहाणपणाचें नाहीं. दुर्लक्ष करावयाचें तें अशा थोर व अलौकिक मंडळींच्या आचारविचारांतील विक्षिप्त वाटणाऱ्या भागांकडे करावयाचें आणि जो खरा व उपयोगी भाग आहे त्याचा उपयोग करण्यास मुळींसुद्धां चुकावयाचें नाहीं, हेंच धोरण आपल्या स्वार्थी दृष्टीनेंहि उपायकारक आहे; आणि याच धोरणानें व दृष्टीनें केतकरी वाङ्मयाचा अभ्यास झाला पाहिजे. या अभ्यासानें बौद्धिक बळकटी वाढेल; आणि हा लाभ काय क्षुद्र आहे? केतकरांचे दोष पुढें पाहूं. परंतु त्यांच्या अनेक विशेषांत संघटनाकुशलता हा गुण अवश्य सांगावयास पाहिजे. अंगीकृत कार्यांत अमक्याचें सहाय्य घेणें अवश्य आहे असें ठरल्याबरोबर ते त्या प्रयत्नास लागत. इतर मतभेद किंवा राग, द्वेष ते फार करून आड येऊं देत नसत; आणि उघडपणें स्वत: जाऊन आपलें म्हणणें पुढें मांडून अवश्य ती अनुकूलता संपादन करण्याची खटपट ते करीत. यामुळेंच प्रि. वै. का. राजवाडे, श्री. पां. म. बापट इत्यादि अनेक भिन्नमतवादी, परंतु गुणी माणसांचा उपयोग त्यांस करून घेतां आला. कोणालाहि भेटतांना ते लहानथोर असा क्षुद्र भेद मानीत नसत आणि व्यर्थ ताठा धरून बसत नसत. प्रसंगीं प्रतिपक्षावर कठोर हल्लेहि चढवीत, परंतु बळकट आशावाद मनांत धरून आपलें म्हणणें दुसऱ्यांस कबूल करावयास लावण्यासाठीं ते शिकस्त करीत. त्यांच्या खिलाडू वृत्तीचीच ही एक चांगली व विजयी बाजू म्हणावयास हरकत नाहीं. हा त्यांचा स्वभाव त्यांच्या इतर महनीय गुणमालिकेंत विशेषच खुलून दिसे.

केतकरांच्या चरित्राचे दोन ठळक भाग पाडतां येतात. त्यांनीं ज्ञानकोश-योजना यशस्वी केली तेथपर्यंतचा एक आणि त्यानंतरचा दुसरा. ज्ञानकोश-मंडळीची बसलेली घडी कशी व कां मोडली हा इतिहास अद्यापि प्रसिद्ध नाहीं. परंतु तो जेव्हां प्रसिद्ध होईल तेव्हां आपणांस

पहिल्या भागापेक्षांहि तो अधिक उद्‌बोधक वाटेल. मराठ्यांनीं साम्राज्य मिळविल्याचा इतिहास जितका स्फूर्तिदायक आहे तितकाच तें साम्राज्य त्यांनीं घालविलें कसें हा इतिहास उद्‌बोधक आहे हेंच म्हणणें ज्ञानकोशप्रकरणींहि लागू होण्यासारखें आहे. पहिल्यांत केतकरांचा उच्च गुणसंचय प्रभावी झालेला दिसतो, तर दुसऱ्यांत त्यांचे दोष परिणामकारक झालेले आढळतील. त्यांचा आग्रह, भावना, आत्मविश्वास, कांहींशी बेफिकिरी, त्यांची उतावळी कल्पकता, त्यांची दडपेगिरी इत्यादि दोषच उत्तर आयुष्यांत गुणांवर मात करणारे ठरूं लागले होते, म्हणून तें चरित्र पूर्वभागाइतकें प्रभावी झालें नाहीं. मात्र त्यांचा आनंदी स्वभाव, परिश्रमशीलता इत्यादि मूळचे मोठाले गुण कांहींसे दुर्बल झाले तरी नष्ट कधींच झाले नाहींत. त्यांचा मराठी बाणाहि उत्तर आयुष्यांत बाहेरून तरी कांहींसा सुटलेला दिसे. पगडी जाऊन टोपी आली, आणि गांव सोडून ते लष्करांत जाऊन ‘ बाह्य ’ बनूं लागले, हा फरक सूक्ष्मदृष्टि निरीक्षकाच्या लक्षांत येण्यासारखा होता. या वेळीं मूळची त्यांची प्रचंड आणि बळकट देहयष्टि पूर्वीप्रमाणें कणखर न राहतां रोगवश होऊं लागली आणि एकंदर कर्तृत्वासहि उतार पडला! त्यांतहि मध्येंच ‘ स्वराज्य मिळविण्याचें श्रेय आपण घ्यावें व घेतलें,’ या कल्पनेनें त्यांना पछाडलें होतें! वास्तविक त्यांचें या प्रकरणींचें मत त्यांच्या बुद्धिमत्तेबद्दल व सूक्ष्म धारणेबद्दल अधिक आदर वाटावयास लावणारें होतें. परंतु या प्रकरणीं इतर सर्वांना नादान व अज्ञान ठरविण्याचा जो अट्टाहास त्यांनीं केला तो त्यांच्या अंगावर आला, आणि त्यांचा आदर होण्याऐवजीं उपहास होण्यांतच त्याचें पर्यवसान झालें. त्यांच्या मूळच्या खंबीर मनावर आणि बळकट शरीरावर या घटनेचा परिणाम झाल्याखेरीज राहिला नसेल. तो ते बाहेर मात्र फारसा

दाखवीत नसत. ज्ञानकोशाची पुढें पुरवणी काढावी आणि त्यासाठीं अधिक वाचक-लेखकवर्ग तयार व्हावा, हा एक हेतु मनांत धरून आणि महाराष्ट्र विद्यापीठाची अंशत: स्थापना करावी या हेतूनें केतकरांनीं 'पोस्ट ग्रॅज्यूएट' पाठशाळा काढण्याची कल्पना काढली होती. केतकरांचें एक असें होतें कीं, कल्पना मनांत येण्याचा अवकाश, लगेच आराखडा तयार करून, छापून, जाहिरात वांटून, त्या दिशेनें पाऊल टाकावयाला प्रारंभ व्हावयाचा! अडचणींस जणूं कांहीं आपण जुमानीतच नाहीं, असें वागावयाचें. या कारणामुळें हा संकल्प वास्तविक उत्तम असूनहि लवकरच मावळला. मग 'प्राचीन महाराष्ट्राचा इतिहास' लिहावा व त्यासाठीं विलायतेस जावें ही कल्पना त्यांनीं पुढें काढिली. राजकीय उद्योगाची त्याला जोड देण्याचा त्यांचा विचार होता. परंतु एकदां घडी विसकटली ती विसकटली! ती कांहीं पुन: पूर्वीसारखी त्यांस बसवितां आली नाहीं.

अशाहि घसरत्या स्थितींत त्यांच्या गुणांचा प्रभाव एवढा मोठा होता कीं, त्यांनीं त्याच्या बळावर प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासाचा एक भाग लिहून प्रसिद्ध केला; आणि दुर्दैवानें जर त्यास अकालीं मृत्यु न येता तर या धीर पुरुषानें आपला हाहि संकल्प हरप्रयत्नानें तडीस नेला असता. अर्थात् कितीहि धडपड केली असती तरी पहिली उभारी कांहीं त्यांस आतां दाखवितां आली नसती. परंतु आपलें सर्वांचें दुर्दैव! तथापि केतकरांच्या विषयीं जी आदराची छाप समाजाच्या मनावर बसली होती ती न पुसून जाण्याइतकी खोल होती, आणि म्हणूनच मंद मंद का होईना, पण समाजाच्या सहानुभूतीचा व सहाय्याचा प्रवाह त्यांच्याकडे वहात राहिला होता आणि तो पुढेंहि तसाच किंवा थोडा अधिकहि वेगवान् झाला असता.

केतकरांची जाडी बुद्धिमत्ता, प्रचंड परिश्रम आणि जळजळीत

मराठी बाणा इत्यादि अनेक महनीय सद्गुण पाहतां आणि त्यांनीं या गुणांचें जें सुफल स्वजनांस समर्पण केलें तें अवलोकन करतां, महाराष्ट्रांतील 'महापुरुष' वर्गांत त्यांची गणना कोणासहि केली पाहिजे यांत तिळमात्र संशय नाहीं. त्यांनीं प्रत्यक्ष संप्रदाय निर्माण केला नाहीं, तरी त्यांचा संप्रदाय आपोआपच स्थापित झाला व ते महाराष्ट्रांतील कोशयुगाचे प्रवर्तक होऊन राहिले. महाराष्ट्राची बौद्धिक उंची त्यांनीं कितीतरी वाढविली! ही त्यांची सेवा त्यांस अमर करणारी आहे आणि केतकरांच्या मूर्तीला महाराष्ट्रियांच्या मनांत आदराचें व पूजेचें ध्रुवस्थान मिळवून देणारी झाली आहे!

केतकरांच्या पूर्वीं रानडे, टिळक व राजवाडे हे असे प्रचंडप्रज्ञ पुरुष महाराष्ट्रांत होऊन गेले. रानड्यांचा अष्टपैलूपणा, दूरदृष्टि व धारणा, टिळकांची असामान्य बुद्धिमत्ता, देशभक्ति, धडाडी आणि राजवाड्यांचा संन्याशी बाणा, प्रतिभा व संशोधनपरायणता या विशेषांमुळें त्या विभूतींनीं महाराष्ट्राच्या इतिहासांत अढळस्थान पटकाविलें आहे. या अजरामर पुरुषांच्या कोटींतच केतकरांचें स्थान आहे. त्यांनीं आपली उज्ज्वल कार्यरेषा एवढ्या जोरानें महाराष्ट्र शरीरावर ओढिली आहे कीं, ती तेजोलेखा तेथें यावच्चंद्र दिवाकरौ लखलखत राहील आणि प्रत्येक महाराष्ट्रीय तिला पाहून विनम्र–मस्तक होत्साता कार्याला लागेल! केतकरांचें व्यक्तिमत्व त्यांच्या कार्यांत सांठविलेलें आहे. ज्या अनेक गुणांमुळें हें व्यक्तिमत्व प्रतीत झालें त्याचें स्वरूपवर्णन कांहींसें या लेखांत यथामति केलें आहे. प्रस्तुत लेखकाला केतकरांचा परिचय जवळजवळ ते हिंदुस्थानांत आल्यापासून झाला; आणि कित्येक मतभेदाचे व खटक्याचेहि प्रसंग आले तरी आमच्या ममत्वांत व्यत्यय आला नाहीं. अनेक कार्यांत केतकर

त्यांच्याशीं विचारविनिमय करीत आणि अनेक प्रसंगीं त्यांचें गुणदर्शन त्यास झालें.

'सहज' किंवा प्राप्त आणि 'आगंतुक' किंवा संपादित अशा उभयविध गुणांशिवाय महत्पद कोणासच लाभत नाहीं. हे उभयविध गुण केतकरांच्या ठायीं भरपूर होते. केवळ प्राप्त गुणांच्या पुंजीवरच व्यापार करणारे असतात ते भरपूर उंचीवर जाऊं शकत नाहींत. एकाच पंखानें आकाशांत उंच भरारी मारणाऱ्या पंगु पक्षाप्रमाणें त्यांची अनुकंपनीय स्थिति होते. प्राप्ताच्या बळावर वाढी दिढी करून जे अधिक 'कमाई' करितात, म्हणजे प्राप्तांत संपादिताची भर टाकतात, त्यांना प्राप्त व संपादित या दोनहि पंखांनीं जगदंगणांत भरारी मारण्याचें सामर्थ्य मिळतें; आणि ते प्रतिकूल परिस्थितीच्या वादळांतूनहि आपला मार्ग काढीत उंच स्थळीं विहरतात. अशा समर्थांत केतकरांची गणना केली पाहिजे, आणि असा 'समर्थ' या आपल्या देशांत आणि आपल्या काळांत आपणांसमोर होऊन गेला याचा अभिमान बाळगून त्याची कीर्ति सांभाळण्यासाठीं कंबर कसली पाहिजे. 'केतकर म्हणजे कर्तृत्व,' हें समीकरण ध्यानांत ठेवून पुढील पाऊल टाकलें पाहिजे.

केतकरांच्या मृत्यूमुळें पुनः एकदां पुढील विचाराला चालना मिळाली पाहिजे, असे केतकरांसारखे जे अद्वितीय पुरुष देशांत निर्माण होतात त्यांस राष्ट्रपुरुष गणून त्यांच्या दोषांकडे दुर्लक्ष केलें पाहिजे आणि त्यांच्या गुणांचा जेवढा म्हणून उपयोग करून घेतां येईल तेवढा घेतला पाहिजे. असा उपयोग करून न घेतां, अशा थोर पुरुषाची उपेक्षा केल्यास राष्ट्रघाताचें महापातक माथीं बसतें. यासाठीं असा 'आत्महत्यारीपणा' न घडावा म्हणून सर्वांनीं विवेकपूर्वक योजना केली पाहिजे. सांप्रतच्या प्रतिकूल काळांत तर केतकरांसारख्या

पुरुषांचा योगक्षेम हें घरचेंच कार्य समजून त्यांच्यासारख्यांचे गुण समाजानें भरपूर राबवून घेतले पाहिजेत. एवढा बोध केतकर चरित्रापासून घडून आला तरी कांहीं कमी कार्य झालें असें म्हणतां यावयाचें नाहीं. दुःखांत सुख मानावयाला तेवढीच जागा राहील.

---

# भाषाशुद्धि-विवेक
# अर्थात्
# माधवरावांची-भाषाशुद्धि

कवि, पंडित व प्रचारक अशा तीन भूमिका माधवरावांच्या आयुष्यांत प्रमुख आहेत. यांतील शेवटची म्हणजे प्रचारकाची भूमिका त्यांची मूळची नव्हे. ती त्यांनीं आपल्या आयुष्याच्या अंत्य पादांतच स्वीकारली होती. त्यांच्या स्वभावाचें सूक्ष्म पृथक्करण केलें तर निश्चयपूर्वक असें म्हणतां येईल कीं, ते हाडाचे कवीच होते. त्यांच्या ठायीं उच्च बुद्धिमत्ता व दीर्घ परिश्रम करण्याचेंहि सामर्थ्य होतें, यामुळें पांडित्याचा उत्कर्ष त्यांनीं करून दाखविला. पण त्यांच्या वृत्तींत पांडित्यापेक्षांहि काव्यच प्रभावी होतें, ही गोष्ट भाषाशुद्धीविषयीं त्यांनीं जें लिहिणें व बोलणें केलें त्यावरून स्पष्ट होण्यासारखी आहे.

'भाषाशुद्धि' या नांवानें जें एक आंदोलन अलीकडे मराठींत आरंभण्यांत आलें आहे त्याचे जनक दुसरे एक प्रतिभाशाली महाराष्ट्रीय आहेत. प्राड्विवाक विनायकराव सावरकर यांनीं आपली तेजस्वी लेखणी शके १८४७ मध्यें इकडे वळविली आणि माधवरावहि त्यांच्या मागोमाग या आखाड्यांत उतरले! तेव्हांपासून चौदापंधरा वर्षें या

विपयावर त्यांनीं बरेच परिश्रम केले, आणि आपली कविता सहसा समाजांत म्हणून न दाखविणारे संकोची माधवराव भापाशुद्धीचे प्रचारक बनले! शके १८६० च्या गुढीपाडव्याला माधवरावांनीं भापाशुद्धीच्या कैवाऱ्यांचा नि विरोधकांचा निरोप (प्रस्ता. पृ. ७) घेतांना आपले या विषयावरील लेख व भापणें ग्रंथरूपानें प्रसिद्ध करून टाकलीं. कारण, या वादांत आतां एखादा 'नवीन आक्षेप' निघेल असें भय त्यांच्या मतें उरलें नव्हतें. अशा चळवळींत जो वेळेचा व्यय करावा लागतो आणि त्या मानानें जें फळ पदरांत पडतें त्याचें गणित लक्षांत आल्यामुळें असेल कदाचित् परंतु आपण थोडें आवरतें घ्यावें, असें त्यांच्या मनाला अलीकडे वाटूं लागलें असावें. तें कसेंहि असो, यानंतर एक गुढीपाडवा काय तो गेला आणि दुसरा उजाडण्याच्या पूर्वीं माधवरावच आम्हांस सोडून गेले. ही विचित्र घटना कोणच्याहि चित्तास शोकानें विदीर्ण केल्याविना राहणार नाहीं !

प्रस्तुत लेखकास भापाशुद्धि-प्रकरणीं माधवरावांचे कित्येक सिद्धान्त अमान्य होते आणि आहेतहि. त्यानें आपला मतभेद लेखरूपानें प्रकट केला नाहीं. याचें एक कारण त्याचा दीर्घसूत्री स्वभाव! माधवरावांचा व त्याचा लोभ तसें म्हटलें तर शके १८४५ पासूनचा. तथापि या विषयावर आम्हां उभयतांची चर्चा एकदांहि झाली नाहीं. कांहीं खेळीमेळीच्या चकमकी उडाल्या, पण त्याहि प्रसंगोपात्त; आणि त्यांतलीच एक जळगांव येथें भरलेल्या साहित्य-संमेलनाच्या भरसभेंत परंतु त्या वेळीं माधवराव स्वत: अध्यक्ष असल्यामुळें उभयपक्षीं अडचणच दिसून आली. माधवरावांच्या प्रस्तुत ग्रंथांत एका स्थळीं (पृ. ४९) प्रस्तुत लेखकाला एक फटका त्यांनीं लगावला आहे. परंतु 'मारलें' (पृ. १५९) यांतला अलंकार ज्याला दिसला

त्याला ' पचविलें ' (पृ. ४९) यांतला अलंकार आठवूं नये काय? असो. भाषाशुद्धि विषयाचा माधवरावांनीं निरोप घेतला असला तरी या प्रकरणीं एखादें द्वितीय युद्ध चालू झालें असतें तर त्यांनीं पुनः आपलीं शस्त्रास्त्रें सांवरून पराक्रम गाजविलाच असता असे रण-झुंजार ते होते यांत संशय नाहीं. अर्थात् आज मनाला विषण्ण करणारा एकच विचार पुढें उभा राहतो आणि तो हा कीं, " आतां कोठले माधवराव? " आणि लेखणी अडखळूं लागते!

माधवरावांच्या ' भाषाशुद्धि–विवेक ' या सुमारें दोनशें पृष्ठांच्या ग्रंथांत एक प्रस्तावना, साधारणतः बाराशें बहिष्कार्य शब्दांचा कोश, व भाषाशुद्धिविषयक एकूण लेख व व्याख्यानें मिळून अकरा विषय इतक्यांचा समावेश झाला आहे. यांतील चार लेखांत त्यांचीं व्याख्यानें उतरलीं आहेत. एक जळगांव साहित्य–संमेलनांतील अध्यक्षीय भाषण व ' प्रतिभा ' पाक्षिकाच्या ' सावरकर–विशेषांका ' मधील ' सावरकरी भाषाशुद्धीची चिकित्सा ' हे त्यांचे दोन स्वतंत्र लेख वगळले तर राहिलेले पांच लेख स्थूलमानानें प्रत्युत्तरात्मक वर्गांत पडणारे आहेत. कालाच्या दृष्टीनें वांटणी केली तर या विषयांत माधवरावांनीं लक्ष घातल्याला पंधरा वर्षें झालीं. पण त्यांच्या एतद्विषयक प्रचाराचा भर शके १८५८ च्या म्हणजे जळगांव साहित्य–संमेलनाच्या वर्षींच विशेष दिसून आला. या एकाच वर्षीं लिहिलेलीं सुमारें ९० पृष्ठें या ग्रंथांत सांपडतील. याचा अर्थ या विषयावरील माधवरावांच्या लिखाणां-तील अर्धें–अधिक लिखाण या एक वर्षांतलें आहे.

सावरकरांनीं भाषाशुद्धीचें शिंग फुंकलें आणि त्यासरशीं माधव-रावांच्या मनानें उठावणी केली. विनायकराव व माधवराव दोघेहि तिभाशाली तसेच भावनाप्रधान प्रकृतीचे गृहस्थ. परंतु एक जनता-सन्मुख तर दुसरे एकांतप्रिय. सावरकरांच्या मताची माधवरावांनीं

आपल्या बुद्धीनें छाननी केली आणि आपली भूमिका निश्चित केली. इंग्रजी भाषेच्या माऱ्यापुढें मराठीचा टिकाव कसा लागेल, मराठी जगवावयाची आणि वाढवावयाची तर काय उपाय योजिले पाहिजेत, हा विचार माधवरावांच्या मनांत प्रबळ झाला. सावरकरांचा कटाक्ष उर्दू शब्द मराठींत घुसले आहेत त्यावरच होता. पण ही दृष्टी माधवरावांना कांहींशी संतापी व मर्यादित वाटली. 'मराठीवरील भयंकर संकट' म्हटलें म्हणजे, इंग्रजी शब्द आमच्या शिकलेल्या लोकांच्या बोलींत प्राचुर्यानें संचार करीत आहेत. आणि बोलींतून जे हळू हळू लेखींत—विशेषतः कथा-कादंबऱ्यांतून उतरत आहेत हें होय. आणि हा झपाट्यानें वाढत असलेला रोग तीव्र उपायांची योजना करून सत्वर निर्मूल केला पाहिजे, नाहींतर मोठा कठिण प्रसंग गुदरेल, या भयाची जाणीव माधवरावांस झाली, आणि लागलीच त्यांच्या जातिवंत कळकळीमुळें ते लेखणी घेऊन पुढें सरसावले.

वस्तुतः सावरकरांनाहि इंग्रजी शब्द मराठींत घुसले तर चालत होते अशांतला भाग नव्हता. परंतु विषयप्रतिपादनांत त्यांचा कटाक्ष मात्र उर्दू संपर्कावरच होता. माधवरावांना प्रथम वाटलें कीं कटाक्षाचा भर इंग्रजीवर ठेवावा, इतकेंच नव्हे तर "(१) मराठींत आलेले फारसी शब्द अल्पसंख्य आहेत, (२) त्यांची संख्या वाढण्याचा संभव नाहीं, (३) मराठींतील प्रतिशब्द ते नामशेष करूं शकले नाहींत, त्यामुळें मराठीच्या सर्गशक्तीस क्षय न लागतां उलट शब्दसंपत्तींत पर्यायवाचक शब्दांची भरच पडली आहे, (४) कित्येक फारसी शब्दांचे अर्थनिवेष पालटल्यामुळें ते जणूं काय पुनर्जन्म पावून मराठमोळ्यांत समाविष्ट झाले आहेत, आणि (५) त्यांना जुने वेष नि जुने अर्थ देण्याकडे म्हणजे पर्यायानें फारसीचें दास्य मानण्याकडे आमच्यांत प्रवृत्ति अद्यापि नाहीं. याचाच बुद्धिग्राह्य कारणांसाठीं पंक्तिपावन झालेल्या मूळच्या

फारसी शब्दांना मराठी भाषेंत गुण्यागोविंदानें राहण्याला मोकळीक असली पाहिजे." (भा. शु. पृ. ११) असा प्रतिपक्ष माधवरावांनीं निर्भीडपणें केला.

थोडींच वर्षें गेलीं आणि माधवरावांचें फारसी शब्दांविषयींचें हें मत बदललें. शके १८५४-५५ च्या कोल्हापूर साहित्य संमेलनांत विषयनियामक समितींत माधवरावांना एक दृश्य दिसलें (पृ. ३६-३७), आणि त्यावरून उर्दूवाल्यापुढें दबून जाण्याची वृत्ति आमच्या-मध्यें प्रबळ आहे असा त्यांचा ग्रह झाला. झालें, त्यानें माधवरावांच्या मराठी मनास एक जोराचा धक्का बसला, आणि त्याचें पर्यवसान सावर-करांशीं प्रतिवाद करतांना ज्या पांच 'बुद्धिग्राह्य कारणांसाठीं' स्वी-कृत फारसी शब्दांच्या संरक्षणाचा पक्षपात माधवरावांनीं दर्शविला होता, ती आपली भूमिका त्यांनीं सोडली! यांत, आपलें पूर्वींचें मत चुकीचें आहे अशी मनाची खात्री होतांच तें बदलण्यास माधवराव भीत नसत, हा त्यांचा निर्भयपणाचा गुण जसा प्रकट होतो, तसें त्यांचीं मतें तितकींशीं बद्धमूल असतातच असें नाहीं या संशयाचेंहि दृढीकरण होतें. आपल्यापुरताच अभ्यास व विचार करीत राहिल्या-नेंहि असा परिणाम संभवतो.

असो, माधवरावांच्या या मतपरिवर्तनाचा सप्रमाण उलगडा आणि जुन्या 'बुद्धिग्राह्य' कारणपंचकाचें सविस्तर खंडण त्यांच्या प्रस्तुत-च्या ग्रंथामध्यें आढळून येत नाहीं. फारसीचें दास्य मानण्याकडे आमची प्रवृत्ति नाहीं, मराठी प्रतिशब्दांना फारसी शब्दांनीं मागें रेटलें नाहीं, आणि मराठीच्या सर्गशक्तीस क्षय लागला नाहीं, हीं पूर्वीं दिलेलीं तिन्ही प्रमुख कारणें पुढें त्यांनीं अमान्य केलीं. कोल्हापुरांत पाहिलेल्या दृश्यामुळें आमच्यामध्यें फारसी दास्याची वृत्ति त्यांना दिसूं लागली, आणि विशेषतः फारसी प्रतिशब्दांनीं मराठीला मागें रेटलें—

ठार मारलें म्हटलें तरी चालेल—असा नवा निष्कर्ष त्यांनीं काढला. माधवराव हे व्यासंगी कोशकार होते. त्यांनीं पुनः नवी चालना केली आणि त्यांना असें दिसून आलें कीं, अनेक गोड व सुंदर मराठी शब्द, तत्समानार्थक फारसी पर्याय मराठींत घेतले गेल्यानंतर आमच्या कोशागरांत संगृहीत असले, तरी त्यांची आठवणच आम्हांस होई-नाशी झाली ! विस्मरण आणि मरण यांत कितीसें अंतर असतें ? " स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति " हा महासिद्धान्त भगवद्गीतेंत श्रीकृष्णांनीं माधवरावांच्या पूर्वीं शेंकडों—सहस्रों वर्षें सांगून ठेवलेला होता. त्याची आठवण जरी माधवरावांना झाली नाहीं, तरी आपल्या बुद्धीनें तेसुद्धां पुनः त्याच सिद्धान्तावर आलें असें म्हण-ण्यास प्रत्यवाय नाहीं. नव्या काळांतील इंग्रजी—संस्कृत शिकलेले विष्णुशास्त्री—परंपरेंतील धुरंधर लेखक पुष्कळ नवे नवे पर्याय संस्कृतच्या बळावर घडवून मराठीची सजवणूक करीत आहेत हें जरी खरें, तरी या नूतन संस्कृत पर्यायांनीं सुद्धां जुने, गोड व गोमटे मराठी शब्द मागें सारलेले आहेत, हेंहि कांहीं इष्ट नव्हे ( पृ. ३९ ). या घटनेचें कारण शोधूं लागल्यावर माधवरावांच्या लक्षांत भरलें कीं, मराठीचें सशास्त्र व सखोल अध्ययनच आमच्या लोकांचें सुटलें आहे. संस्कृत भाषाविषयाचें शिक्षण पदवीपरीक्षेस अनिवार्य असूं नये, या मताचा पुरस्कार करणाऱ्या प्रस्तुत लेखकासारख्यांची ओरड हीच होती. माधवरावांना हें मत पूर्वींपासूनच मान्य असावें; परंतु भाषाशुद्धि प्रसंगानें त्यांनीं जो विचार केला त्यामुळें या सिद्धान्तास नवें बळ आलें यांत शंका नाहीं ( पृ. १२७ व १४३ ).

औंध येथें दिलेल्या व्याख्यानांनीं ( शके १८५५ ) ' परभाषें-तील शब्द हा मराठीच्या देहांतील सत्त्व शोषण करणारा रोग आहे ' अशी घोषणा ( पृ. २१ ) माधवरावांनीं निकरानें केलेली आढळते.

पूर्वीच्या मराठेशाहींत आम्ही झोपीं गेलों आणि खुशाल फारसी शब्दांचें स्वागत केलें. परंतु 'आमच्या पूर्वजांना स्वभाषाभिमान नव्हता म्हणून आमच्या अंगींहि तो नसावा असें थोडेंच आहे?' असा प्रश्न (पृ. २७) यावर माधवरावांनीं टाकला. आणि 'आमची वृत्ति पार पालटली म्हणजे मग शें-दोनशें परभाषांतील शब्द मराठींत राहिले काय न राहिले काय; ते मराठीचें कांहीं वांकडे करूं शकणार नाहींत. तोंपर्यंत परकीय भाषांतील शब्दांवर बहिष्कार हा अत्यावश्यक आहे.' या शब्दांनीं त्यांनीं परकीय शब्दांचा बहिष्कार पुकारला. (पृ. २९)

औंधच्या व्याख्यानाचा तेथल्या तेथें एक मोठा परिणाम घडून आला. औंधचे देशाभिमानी अधिपति श्री. बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांनीं माधवरावांचें व्याख्यान ऐकून मराठी पत्रांवर आपली 'B. S. Pant' ही इंग्रजी सही करण्याचा क्रम थांबवून यापुढें 'भवानराव' अशी स्वच्छ मराठी स्वाक्षरी करण्याचा क्रम स्वीकारण्याचें ठरविलें असल्याची घोषणा केली! स्वभाषेच्या कळकळीच्या प्रतिपादनाचा जसा तो परिणाम होता, तसाच त्यांच्या मोहक व भारदस्त वक्तृत्व शैलीचाहि समजला पाहिजे. तेव्हांपासून एकांतप्रिय माधवराव प्रचारक बनले. आणि त्यांच्या ठायीं आकर्षक व परिणामकारक वक्तृत्व-कलाहि वास करीत आहे याचा प्रत्यय महाराष्ट्रजनांस आला. माधवरावांनीं तर जागजागीं जाऊन भाषाशुद्धीचा दौराच केला आणि आपल्या प्रभावी वक्तृत्वानें महाराष्ट्रास मोहिनी घातली. या प्रसंगांतून त्यांची विद्वत्ता, तर्ककुशलता, प्रतिष्ठित वादसरणी व टाशीव वाणी यांचा अनुभव श्रोत्यांस भरपूर आला.

जो पक्ष माधवरावांनीं आतां स्वीकारिला त्याप्रमाणें आचरण करून दाखविणें त्यांस प्राप्तच होतें. त्यांना स्वतःलाहि कांहीं ढोंग करावयाचें नव्हतें. अंतरींच्या उमाळ्यामुळेंच ते या कामांत पडले

होते. तेव्हां बोलण्याप्रमाणें त्यांनीं कृतीहि करून दाखविली. फारसी, इंग्रजी इत्यादि परभाषांतील शब्द आपल्या व्याख्यानांत किंवा लेखांत कोठें येऊं न देतां, जुन्या मराठी शब्दांचा उच्चार करून आणि नवे पर्याय कुशलतेनें योजून भाषेंतील गोडी किंवा आवेश किंचित्हि उणावूं न देतां, त्यांनीं या पुढील आपले सर्व लेख लिहिले आणि भाषणें केलीं. स्वाभिमानाच्या पक्षपाताचें बोलणें श्रोत्यांस चटकन् रुचावें यांत नवल नाहीं; परंतु अनभ्यासामुळें रूढ फारसी किंवा संपादित इंग्रजी शब्दांना आमच्या मराठींत कोणते पर्याय योजावे हीच अडचण त्यांना भासे. 'मुद्दाम' शब्द घालूं नका म्हटलें तर त्याच्या जागीं जातिवंत मराठी पर्याय कोणता योजावा? माधवराव लागलीच 'जाणून बुजून, बुद्धया, बळें' असे एकामागून एक पर्याय पुढें ठेवीत. श्रोत्यांवर व वाचकांवर सहज परिणाम होई! crocodile tears 'नक्राश्रु' हें दुबळें भाषांतर तुम्हांस कसें चालतें? 'मृगजला'ला इंग्रजींत dear-water म्हटलें तर शोभेल काय? माधवरावांचे हे प्रश्न ऐकतांच ऐकणाऱ्यास आपल्या मूर्खपणाचा व अज्ञानाचा अचंबा वाटे! मग वरील ठिकाणीं काय म्हणावें? माधवराव सुचवीत 'नक्राश्रु' न म्हणतां 'कृतकाश्रु' म्हणा तें न पटेल तर सुसमुचितसा दुसरा सुंदर पर्याय शोधून काढा नि योजा! अडून बसा म्हणजे सुचेल, दबून जाल तर बुडाल असा माधवरावांचा संदेश असे.

मग माधवरावांनीं प्रचारासाठीं कांहीं निवडक शब्दांची व उदाहरणांची यादीच तयार केली. Fashion 'लाटूम' 'कमाली' ला पराकाष्ठा' 'बाजू'-कड, अंग, 'साफ'-पार, 'जोराचा'—निकराचा, अशीं शेंकडों शेलकीं उदाहरणें पुढें मांडून ते आपलें म्हणणें पटवून देत. प्रस्तुत 'भाषाशुद्धिविवेक' या ग्रंथाला त्यांनीं सुमारें बाराशें बहिष्कार्य

शब्दांचा कोशच जोडून दिलेला आहे. तो पाहिला असतां त्यांच्या परिश्रमाची कल्पना येईल.

सावरकरांची व आपली भूमिका तंतोतंत एक नाहीं हें सांगत असतां माधवराव म्हणतात, "सावरकर यांची चळवळ हिंदु संघटने-साठीं हिंदु धर्माभिमानावर उभारलेली आहे, आणि ते त्या चळवळी-ला मराठी भाषेचें शुद्धीकरण म्हणतात. माझी खटपट सत्वसंरक्षणासाठीं असून ती स्वभाषाभिमानावर उभारलेली आहे; म्हणून मी माझ्या उद्योगाला स्वकीयांचा पुरस्कार आणि उद्धार म्हणतों. भाषांचे हिंदु आणि अहिंदु असे वर्ग मी करीत नाहीं, तर मराठी आणि अमराठी असे दोन वर्ग कल्पितों. मला 'मुसुलमानी शब्दांची घाण' येत नाहीं. मला सर्वच विदेशी शब्दांचा स्वीकार हा प्राणघातक वाटतो........ मराठी भाषेचें स्वरूप—केवळ हिंदूनींच ठरवावयाचें नाहीं.... इतर धर्मांतील व प्रांतांतील लोकांनीं मराठीला मातृभाषा मानून, तिच्या-विषयीं स्वाभिमान, ममत्व बाळगून, तिची सेवा करायला यत्किंचित् आडकाठी नाहीं. (पृ. ३८) 'मराठी आणि अमराठी' या भेद-भूमिकेवरून माधवराव 'टकळी' या गुजराती शब्दाला जवळ न करतां 'चाती' हा मराठी शब्दच स्वीकारिला पाहिजे असें प्रतिपादीत. मात्र 'भलामण' या गुजराती शब्दाची 'भलावण' हि ते करीत असत. कोणी 'संघटने' च्या ऐवजीं 'संगठण' म्हटलें कीं ते त्याचा विरोध करीत. 'शेतकरी' त्यांना प्रिय होता, परंतु 'किसाना' ला ते दूर लोटीत (पृ. १४२ व १४९).

भाषाभाषांत व लोकालोकांत दळणवळण चालून शब्दांची देवघेव होते, तर तशी देवघेव अग्राह्य व त्याज्य मानावयाची कीं काय? नव्हे, माधवरावांचें तसें मत नव्हतें. दळणवळणाची देवघेव त्यांना मान्य होती. फारसी शब्दांवर ते जो बहिष्कार पुकारीत होते त्याचें

कारण, त्यांच्या मराठींत आलेले फारसी शब्द 'आपल्या नि आपल्या पूर्वजांच्या निष्काळजीपणामुळें वा परधार्जिण्या दास्य वृत्तीमुळें शिरलेले आहेत; ते केवळ दळणवळणानें नि व्यापारी देवघेवीनें आलेले नाहींत.' (पृ. ६५). आतां येथें थोडी मौज पाहाण्यासारखी आहे. मराठी-प्रमाणेंच बंगालींतहि फारसी शब्द घुसलेले आहेत. तेथेंहि ते कांहीं दळणवळणाच्या मार्गानें आलेले नाहींत. 'आम्ही राष्ट्रीयदृष्ट्या उदासीन नि अजागलक आहों' (पृ. ९६) आणि बंगाली मात्र मोठे जागृत होते अशांतलाहि प्रकार नाहीं. असें आहे तरी माधवराव काय म्हणतात पाहा: "मी बंगाली असतों तर बंगाली भाषेविषयीं बोलतांना फारसी शब्दांच्या विरुद्ध चळवळ मी कधींहि केली नसती; कारण, बंगाल प्रांतांत हिंदु मुसलमान दोघेहि बंगाली भाषेला मातृभाषा मानून तिची सेवा करीत असल्यानें त्या प्रान्तांत भाषाविषयक द्वैत नाहीं" (पृ. ९८). अमुक अमुक प्रकारची परिस्थिति असती तर 'मराठी भाषाशुद्धीचा प्रश्नच उपस्थित झाला नसता, आणि तसा तो कोणीं केला असता तर मीच त्याला आधीं विरोध केला असता' (पृ. ६४), असेंहि लिहिण्यास माधवराव कचरले नाहींत. फारसी शब्दांवरील त्यांचा बहिष्कार कांहीं काळापुरताच (पृ. ६५) मर्यादित असावा असें दिसतें. त्यांची आणखी एक कबुली पहा: "अर्थाच्या सूक्ष्म छटा दाखविणारे थोडे परकी शब्द एक वेळ चालतील" (पृ. १३१).

यावरून असें ठरलें कीं, (१) दळणवळणाच्या मार्गानें परकीय शब्द आले तर चालतील; (२) मुसलमानांनीं मराठी ही स्वभाषा मानिली तर फारसीवरील बहिष्कारास विरोध करणें अयुक्त होईल; आणि (३) अर्थाच्या छटा दाखविण्यासाठींहि थोडे परकीय शब्द चालतील. मग फारसीच्या स्वीकारामुळें मराठी शब्दांचा मराठीपणा जर

उणावतो, तर " मराठीचा मराठपणा उणावणारे हे शब्द मराठी कसे ( पृ. ४३ ) या माधवरावांनींच पूर्वी विचारलेल्या प्रश्नाचें त्यांचें उत्तर काय? तसेंच, दहा वर्षांपूर्वींची स्वतः केलेली 'घोडचूक' (पृ. ४४) किंवा 'आतां अनुभवानें मला असें पटलें आहे कीं, या अल्पसंख्य फारसी शब्दांनींसुद्धां मराठी शब्दांना मृत्युपंथाला लाविलें आहे." ( पृ. ३० ) हें जर खरें, तर तो त्यांच्या मृत्युपंथावरील योजनेंत कसा टळणार? या लेखाची संकल्पित मर्यादा लहान असल्यामुळें एवढ्या-वरच थांबणें प्राप्त आहे. सर्वथा प्रसंगोचित न म्हणतां आलें, तरी प्रसंगप्राप्त म्हणून ओझरता का होईना, इकडे किंचित् वळलों तेवढेंच येथें पुरे. खेद इतकाच वाटतो कीं, सविस्तर परामर्श कधीं पुढें मागें घ्यावयाचें मनांत आणिल्यास माधवराव प्रतिपरामर्शास विद्यमान् नाहींत !

'मराठी शब्द' कोणास म्हणावें याची शास्त्रशुद्ध व्याख्या केल्या-शिवाय स्वकीय परकीय विचार विभागणी कशी संभवते? पायाशुद्ध चर्चा व्हावयाला अशी प्रथम व्याख्या करावयास पाहिजे. एकदां प्रस्तुत लेखकानें तसें आव्हानहि केलें होतें. परंतु माधवरावांनीं किंवा अन्य तन्मतवाद्यांनीं अशी व्याख्याच केली नाहीं. भाषेचा शब्द-संग्रह कोणकोणत्या मार्गानें वाढत असतो? जगांतील भाषांचा इति-हास काय सांगतो? मराठींत फारसी शब्द घेतले त्याचें कारण फारसी विषयींची आमची दास्यप्रवृत्ति कीं स्वभाषेविषयीं उपेक्षाबुद्धि कीं गरज आणि नव्या शब्दांतील गुणांचा उजवेपणा?

अन्य भाषेंत एखाद्या शब्दाचा समावेश कसा होतो, या समा-वेशानें भाषेची शक्ति क्षीण होते कीं वाढते, सरसकट सर्व समाज एकच भाषा व समान शब्दसंग्रह वापरीत असतो काय, इत्यादि अनेक प्रश्न पुढें घेऊन त्यांचा स्वतंत्र व शास्त्रीय खल केल्याशिवाय

प्रकृत विषयाची योग्य मीमांसा होऊं शकणार नाहीं. 'पूर्वी तुम्हीच फारसी शब्द पद्यांतहि योजून 'अल्ला हु अकबरी' जमाना चालू केला, मग आतांच फारसीवर रोष कां?' असा प्रश्न कोणी केला, तेव्हां माधवरावांनीं 'फारसी शब्द गद्यांत चालतात, मग पद्यांतहि कां चालू नयेत? चालवून दाखवितों असें म्हणून मी बंड केलें,' असें समर्थन केलें. जणूं काय कविता केल्या तेव्हांहि फारसी बहिष्कार त्यांस मान्य होता! परंतु फारसी शब्दांनीं मराठींत भरच पडली आहे अशी जी कबुली त्यांनीं 'विविधज्ञान–विस्तारां'तील (या ग्रंथांतील पहिल्या) लेखांत कविताप्रसिद्धीनंतर दिली होती तिचा आणि वरील उलटसुलट विधानांचा मेळ कसा घालणार हें त्यांनीं स्पष्ट केलें नाहीं. भूमिका शास्त्रीय पायावरची असती तर हेलकावे बसते ना!

असो. हा विचार कसाहि असला तरी प्रस्तुत 'भाषाशुद्धि-विवेक' हा ग्रंथ माधवरावांचा, त्यांतील विद्वत्ता, भाषाप्रभुत्व व लेखनप्रौढी या गुणांस्तव केव्हांहि वाचनीय ठरेल. प्रतिपाद्य विषय गहन असून त्यावर मराठींत ग्रंथहि एखाद दुसराच आहे. अर्थात् मराठी भाषेच्या सूक्ष्म अभ्यासाचा जो कैवार माधवरावांनीं येथें प्रकट केला आहे तो अनुकरणीय होय. या व अशा अनेक कारणांस्तव माधवराव त्यांचा ग्रंथ हे सदा संस्मरणीयच ठरतील.

---

# साहित्यसम्राट् केळकर अमर आहेत

साहित्यसम्राट् पदवीनें अखिल महाराष्ट्रानें प्रेमानें गौरविलेले श्री. नरसोपंत केळकर आपली शेवटची कविता लिहून काळझोपीं गेले. सतत पन्नास वर्षें त्यांनीं मराठी साहित्याची अखंड सेवा केली. त्यांचे सातारचे स्नेही दादासाहेब करंदीकर यांनींहि आपल्या दैनंदिनींत शेवटच्या ओळी स्वहस्तानें लिहून इहलोक सोडला. तसाच चमत्कार तात्यासाहेबांच्या संबंधांतहि घडून आला.

## महान् वाग्यज्ञ

इ. स. १८९६ मध्यें 'केसरी' संस्थेंत प्रविष्ट होण्यापूर्वी तात्यासाहेबांनीं 'नवरदेवाची जोडगोळी' हें नाटक प्रसिद्ध केलें होतें. आणि कांहीं इतर लेख लिहून लिहिण्याची आपली हौस प्रगट केली होती. ही आपली हौस आपणाला मनसोक्त भागवितां येईल, हा एक हेतु 'केसरी' मध्यें येण्याचें निमंत्रण स्वीकारण्यांत आपल्या मनांत होता, असें तात्यासाहेब स्वतः सांगतांना आम्ही ऐकलेलें आहे. 'केसरीं'त आल्यावर ही हौस भागविण्याचें भाग्य त्यांच्याइतकें कोणासहि लाभलें नाहीं आणि त्यांनीं आपल्या भागवलेल्या हौसेमुळें चटकदार लेख वाचण्याची हजारों वाचकांची हौस जेवढी त्यांनीं भागविली, तेवढी भागविण्याचें भाग्यहि दुसऱ्या कोणास लाभलें नाहीं. तात्यासाहेब यांनीं केवळ 'केसरी' मध्येंच लेखन केलें असें नाहीं. जुन्या काळीं

महाराष्ट्रांत ज्येष्ठ आणि श्रेष्ठ गणलेल्या 'विविधज्ञानविस्तार' मासिकांत त्यांनीं 'सुभाषित आणि विनोद' या विषयावर अनेक लेख लिहिले आणि त्या लेखांवरून आपलें त्या विषयावरील पुस्तक प्रसिद्ध केलें; 'तोतयाचें बंड' या नांवाचें एक सर्वोत्कृष्ट नाटक त्यांनीं लिहून उत्कृष्ट नाटककार म्हणून कीर्ति मिळविली. 'कृष्णार्जुनयुद्ध' 'चंद्रगुप्त' 'अमात्य-माधव', 'वीरविडंबन' वगैरे आणखी सात नाटकें त्यांनीं लिहिलीं. टिळक आणि गॅरिबाल्डी यांचीं चरित्रें त्यांनीं लिहून प्रसिद्ध केलीं. 'मराठे आणि इंग्रज' या विषयावर एक अत्युत्कृष्ट आणि मननीय असा प्रबंध प्रसिद्ध केला.' भारतीय तत्त्वज्ञान', 'ज्ञानेश्वरी','राज्यशास्त्र' इत्यादि विषयांवरहि त्यांनीं कांहीं लहान मोठे ग्रंथ लिहिले. 'नवलपूरचा संस्था-निक' व 'बलिदान' अशा दोन कादंबऱ्याहि त्यांनीं लिहिल्या. 'माझी गाडी कशी चुकली?' वगैरे लघुकथाहि लिहिल्या. त्यांच्या कवितांचीं एक-दोन पुस्तकें प्रसिद्ध आहेत. 'आयर्लंड आणि हिंदुस्थान' या विषया-वर 'केसरीं'त लिहिलेल्या लेखमालेच्या आधारें 'आयर्लंडचा इति-हास' या नांवाचा एक वाचनीय ग्रंथ त्यांनीं प्रसिद्ध केला. 'संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन' हें त्यांचें पुस्तक केसरींत त्या विषयावर लिहि-लेल्या लेखमालेचेंच फळ होय. याशिवाय 'प्लेजर्स ॲन्ड प्रिव्हिलेजेस ऑफ दि पेन', 'ए केस फॉर इंडियन होमरुल' वगैरे त्यांचे इंग्रजी ग्रंथ प्रसिद्ध आहेत. अगदीं अलीकडे त्यांनीं 'सह्याद्रि' मासिकांत नियमानें लेखन केलेलें आढळतें. इतर कित्येक मासिकांतून त्यांचे लेख प्रसिद्ध होत असत. 'वाङ्मयशोभा' त्यांच्या घरचीच होती असें म्हटलें तरी चालेल. त्याशिवाय त्यांनीं केलेलीं अनेक अध्यक्षीय व इतर भाषणें छापून प्रसिद्ध झालेलीं आहेत. त्यांचे मित्र कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्या 'मतिविकार' नाटकावर 'ज्ञानप्रकाश' वर्तमानपत्रांतून मूळ प्रसिद्ध झालेला त्यांचा

टीकात्मक परामर्श ते किती उत्कृष्ट टीकाकार होते, याची साक्ष पुरविती. इतरांनीं लिहिलेल्या अनेक लहानमोठ्या ग्रंथांना त्यांनीं लिहिलेल्या प्रस्तावनाहि वाचनीय आहेत. आपल्या लेखसंग्रहाचे प्रत्येकीं सुमारें १००० पृष्ठांचे १२ खंड, जे त्यांनीं इ. स. १९३८ मध्यें प्रसिद्ध केले, त्यांत त्यांच्या विविध लेखांचें व ग्रंथांचें पुनर्मुद्रण करण्यांत आलें आहे. केळकरांचा हा अचाट वाग्यज्ञ पाहून ‘ साहित्यसम्राट् ’ म्हणून स्वाभाविकपणें त्यांना सर्वांनीं मानाचा मुजरा केला असेल, तर त्यांत नवल काय ? साहित्यक्षेत्रावर व त्यांतील विविध विभागावर एवढें दीर्घकालीन प्रभुत्व गाजविणारे केळकर हे एकच अनन्यसाधारण लेखक ठरले. ते तर आपणांतून गेले, पण आपल्या लेखांच्या समृद्ध भांडाराचा वारसा ते आपणां सर्वांसाठीं ठेवून गेले आहेत. त्यांचा यथोचित परामर्श घेणें हें आतां आपलें काम आहे.

## गाढ व्यासंग

केळकर यांस लेखनाची अनिवार हौस होती. आपलें लेखन सर्वोत्कृष्ट व्हावें एतदर्थ ते मनापासून झटत असत. आपले संपादकीय व इतर सार्वजनिक व्याप सांभाळून आणि त्यांतल्या त्यांत वेळ काढून ते आपल्या आवडीच्या विषयावर सतत व्यासंग करीत असत. त्यांचा मुख्य व्यवसाय पत्रकाराचा असल्यामुळें, सतत लिहिणें हा त्यांचा धर्मच झाला असला तर त्यांत नवल नाहीं. तथापि केळकरांचा विशेष असा दिसून आला कीं, ‘ केसरी ’सारख्या प्रतिष्ठित, भारदस्त आणि जबाबदार अशा वर्तमानपत्रांत जे विविध राजकीय, सामाजिक, शैक्षणिक, आर्थिक वगैरे विषय लोकांपुढें मांडावे लागतात, त्या विषयांचा त्यांनीं कसून अभ्यास केला. या त्यांच्या अभ्यासाचें फळ त्यांच्या लेखनांत आपणांस भरपूर चाखावयास मिळतें. अभ्यास करण्याची

तीव्र तत्परता मिळविलेलें ज्ञान लेखांच्या द्वारें फुलवून आणि सजवून लोकांपुढें मांडण्याच्या कामींहि त्यांनीं दाखविली. अर्थशास्त्र आणि राजकारण या विषयांचा व्यासंग केसरीसारख्या वर्तमानपत्रांतील प्रमुख व्यक्तीस ठेवावा लागे, हें उघड आहे. केळकर यांच्यापुढें त्यांच्या पूर्वींच्या पिढींतील ना. गोखले किंवा रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी यांच्यासारखी अखिल भारतीय कीर्तीची व्यासंगी मंडळी महाराष्ट्रांतच होती. खुद्द ' केसरी 'चे चालक लो. टिळक यांची गणना गाढ्या विद्वानांत केली जात असे. प्रथम त्यांच्या हातांखालीं, नंतर त्यांच्या गैरहजेरींत आणि पुढें त्यांच्या सांवलींत पण स्वतंत्रपणें केळकरांनीं यशस्वीपणें ' केसरी ' चालविला, आणि सर्वांकडून मुक्तकंठानें आपली प्रशंसा झालेली अनुभवली. जात्याच त्यांना साहित्याचें अनिवार प्रेम होतें. त्यांच्या या साहित्याच्या गाढ व्यासंगामुळें केळकरांच्या लेखनशैलीला एक अभिनव आणि सुचारु असें स्वरूप प्राप्त झालें.

## केळकर व खाडिलकर

टिळकांच्या लेखनशैलींत विषयांची पकड आणि तो लोकांपुढें सोप्या, सरळ नि खोंचक परंतु ठसकेदार पद्धतीनें मांडण्याची दक्षता दिसून येते. टिळक हे जातीचे कर्ते, प्रेरक आणि मार्गदर्शक असे अद्वितीय पुढारी होते. त्यांची धडाडी आणि आत्मविश्वास असामान्य होता. त्यांना मिळालेले दोन प्रमुख तरुण सहकारी म्हटले म्हणजे केळकर व खाडिलकर हे होत. या दोघांनीं टिळकांच्या कीर्तीला शोभेल अशा आढ्यतेनें ' केसरी 'ची कीर्ति संभाळली. टिळकांच्या धोरणाशीं समरस होण्यावर खाडिलकरांचा भर अधिक होता असें दिसून येईल. खाडिलकर यांनीं ' केसरीं ' त लिहिलेले लेख दुर्दैवानें पुष्कळांनीं आग्रह केला असतांहि अद्यापपर्यंत एकत्रित करून छाप-

ण्यांत आले नाहींत. कदाचित् याविषयींची त्यांची प्रतिकूलता लव-करच दूर होऊन खाडिलकरांचें लिखाण जगासमोर येईल. त्या वेळीं आमच्यावरील विधानाची मुक्तता तरुण पिढींतील वाचकांस ठरविण्याचें साधन मिळेल. उदाहरणार्थ, १९०८ सालीं टिळकांना शिक्षा झाल्यानंतर मुंबईस सतत आठ दिवसापर्यंत मजुरांच्या प्रक्षोभाचें जें प्रचंड निदर्शन झालें, त्याला अनुलक्षून 'सर्वांत पुढें मुंबईच कां?' या मथळ्याचे जे पांच सात अग्रलेख खाडिलकर यांनीं लिहिले आहेत आणि त्यांत या घटनेची ज्या पद्धतीनें मीमांसा केली आहे, ती वाचली असतां केळकर आणि खाडिलकर या दोघांच्याहि मनोवृत्तींतील मूलभूत फरकाचें आपणांस ज्ञान होईल. खाडिलकरांची मनःप्रकृति प्रखर आणि लिहिणें आवेश आणि त्वेष यांनीं युक्त, तर केळकर यांची मनःप्रकृति सौम्य आणि शीतल, त्यांचें लेखन समतोल आणि संयमी. असा हा उभय टिळक-शिष्यांच्या लेखणींतील फरक सांगण्यासारखा आहे. केळकरांच्या लेखणींत खाडिलकरांच्या लेखणींतील जहरी तिखटपणा आपणांस पहावयास मिळणार नाहीं; आणि खाडिलकरांच्या लिखाणांत केळकरांच्या लिखाणांतील सौंदर्य आणि सुगंध आपणांस अनुभवावयास सांपडणार नाहीं.

## 'केसरी' ला साहित्यिक झळाळी

आगरकरांच्या लेखणींतून आवेशाबरोबरच कांहीं नटवेपणाची झांक आपणांस आढळून येते. परंतु पुढें टिळकांच्या लेखणीचें राज्य चालू झाल्यावर 'केसरीं'त तलवारीचें पाणी सतत चमकत राहिलें. परंतु हें पाणी पिणाराच्या पोटांत आग भडकविल्याशिवाय राहत नसे. केळकरांच्या लेखणीचें राज्य सुरू झाल्यावर साहित्यिक निर्झराचें मधुर जल लोकांस मनसोक्त प्राशन करण्याची संधी मिळाली. टिळक आणि

खाडिलकर यांच्या शब्दांत वाचकांच्या वृत्तीत चळवळ उत्पन्न करून त्यांना उड्डाण करावयाला लावण्याचा गुण अमूप दिसून येत होता. तर केळकरांच्या शब्दांत वाचकांच्या वृत्तींना स्थिरावून वटणीवर आणण्याचा गुण अधिक दिसून येत होता. 'केसरीं'तील लेखांना केळकरांनीं जी नवी आणि रम्य अशी साहित्यिक झळाळी लावली, त्यामुळें रसिक वृत्तीच्या सुशिक्षित वर्गामध्यें त्यांनीं 'केसरी' विषयीं नवीन आकर्षण निर्माण केलें. किंबहुना अशा वाचकांचा एक नवीन वर्गच त्यांनीं 'केसरी' ला मिळवून दिला. पूर्वींचा सुशिक्षितांचा नेमस्त वर्ग टिळकांच्या आणि गांधींच्या जोरदार हल्ल्यामुळें नेस्तनाबूद झाला होता. त्या मोकळ्या मैदानावर येऊन पोहोंचणाऱ्या नवीन सुशिक्षितांच्या पिढीस केळकरांनीं आपल्या लेखणींतील माधुर्यानें आणि चातुर्यानें भारून टाकिलें; त्यांची सार्वजनिक हितबुद्धि जागृत केली. खाडिलकर आणि केळकर यांनीं ज्या वेळीं वृत्तपत्रसृष्टींत प्रवेश केला त्याच वेळीं महाराष्ट्र वृत्तपत्रसृष्टींत एका महान् ताऱ्याचा उदय झाला; आणि त्याच्या तेजानें लोक चकित झाले. त्यांचे डोळे दिपून गेले. महाराष्ट्रांतील असंख्य तरुणांचीं मनें आपल्या लेखणीला बांधून 'काळ' कर्त्यांनीं त्यांना भावनेच्या स्वर्गलोकांतील देवतांचा दरबार दाखविला. लो. टिळक समोर उभे असतांना त्यांना अदबीनें नमस्कार करीत करीत शिवराम महादेव परांजपे यांनीं हा चमत्कार करून दाखविला. परांजपे यांच्याप्रमाणें स्वर्गभरारी मारून उंच आकाशांत यथेच्छ विहार करणें किंवा टिळकांप्रमाणें जमीन फोडून पाताळांतील शेषाच्या टाळूचा भंग करणें असला हव्यास केळकरांच्या लेखणीनें धरला नाहीं. पण आपल्या असंख्य वाचकांना याच पृथ्वीवर विचारांच्या रम्य उद्यानांत सुखद संचार त्यांनीं यथेष्ट घडविला. 'केसरी' ला हें अपूर्व वैभव एकट्या केळकरांनींच मिळवून दिलें आहे.

## साहित्याच्या सुवर्ण–ताटांत ज्ञानाचा अहेर

आपल्या मोहक लेखनशैलीनें लोकांचीं मनें मारून टाकावीं आणि त्यांच्या मनाचें आपल्या लेखनकौशल्यानें रंजन करावें, हा कांहीं केळकरांचा प्रधान हेतु नव्हता आणि असता तरी तो 'केसरी' च्या परंपरेला कधींच जुळला नसता. ज्ञानाच्या भांडारांतील नित्य नवी लूट, निरलसपणें आणि दीर्घ प्रयत्नांनीं मिळवून आणावी आणि ती आपल्या असंख्य जिज्ञासू बांधवांना मनमुराद वाटावी, या इच्छेची ओढ हीच केळकरांच्या लेखनाला मुख्यत्वें कारणीभूत झालेली आहे. किंबहुना ज्ञानभांडाराची खुली लयलूट करण्यांत मनापासून संतोष मानणारा केळकरांच्यासारखा दुसरा एकहि मराठी लेखक आपणांस दाखवून देतां येणार नाहीं ही ज्ञानलुटीची सात्विक ईर्ष्या केळकरांच्या यशाचें परमकारण समजण्यास चिंता नाहीं. पण एवढ्यानें हें भागत नाहीं. ज्ञानावरोबरच सत्कार्य-प्रेरणा, आणि सद्भावनांचा परिपोष घडवून आणण्याची ईर्ष्याहि त्यांच्या ठायीं तितकीच प्रबळ असल्याचें दिसून येतें. ज्ञान, सदिच्छा आणि सत्कार्यप्रेरणा या त्रयीचा अहेर, अर्धशतकाच्या दीर्घ काळांत केळकरांनीं जेवढा केला, तेवढा आमच्या समाजास दुसऱ्या कोणी क्वचितच केला असेल आणि हा अहेर त्यांनीं साहित्याच्या नक्षीदार सुवर्णताटांत गर्भश्रीमंताच्या अदबीनें लोकांस सादर केला आहे. या कामांत केळकरांची बरोबरी करणारा, किंबहुना त्यांच्या जवळपास येणाराहि दुसरा संपादक लेखक दाखवितां येणार नाहीं.

## मनाची दिलदारी

'केसरी'च्या स्तंभांतून, दर आठवड्याला केळकरांनीं अनेक वर्षें जें लिखाण लिहिलें, त्यांत वर दर्शविल्याप्रमाणें अनेक गुणांचा एकत्र

समुच्चय त्यांच्या ठायीं झालेला आपल्या प्रत्ययास येतो. उत्कृष्ट युक्तिवाद, मार्मिक वकिली, व्यापक ज्ञान, माफक झुंझारपणा, मोहक प्रसाद, वेधक भाषाशैली, संस्मरणीय उपमादि अलंकार, उदार न्यायबुद्धि आणि प्रसन्न प्रांजलपणा या सर्व गुणांचा सांठा त्यांच्याजवळ इतक्या भरपूर प्रमाणांत आढळून आला कीं, त्यांना यांपैकीं कशाचीहि तूट म्हणून कधीं भासलीच नाही. त्यांच्या आवडीचे ‘ अनुयोगी ’ आणि ‘ प्रतियोगी ’ हे जरी त्यांच्या लेखांतून एखाद्या राजाबरोबर वागणाऱ्या शरीररक्षकांप्रमाणें केळकरांच्या संगतींत सतत वावरतांना आढळून येतात, तरीहि नवे नवे शब्दप्रयोग, कोट्या आणि वचनें यांची पेरणी त्यांच्या लेखांतून सतत केली जात असल्यामुळें नित्यनूतनपणाची टवटवी कधींच लोपली नाही आणि त्यांच्या चविष्ट लेखांचा आस्वाद घेण्याची वाचकांची आसोषी कधींहि हरपली नाहीं केळकरांच्या साहित्यसेवेच्या सदभिरुचि पोषक अशा आणखी एका विशेषाचें कृतज्ञतेनें स्मरण केलें पाहिजे. ‘ केसरी ’चीं सर्व पानें आपणच अडवावीं, असा संकुचितपणा त्यांनीं कधींच दाखविला नाहीं. उलट नव्या नव्या लेखकांनीं पुढें यावें आणि ‘ केसरीं ’ तून आपली करामत जगाला दाखवावी असें त्यांस मनापासून वाटे. त्यांच्या या उदार धोरणामुळें अनेक नव्या लेखकाना त्यांच्याकडून मनःपूर्वक उत्तेजन आणि मार्गदर्शन झालें आहे. इतरांच्या लेखनकौशल्यामुळें हरकून न जाऊन ते त्यांचें स्वागत करीत असत आणि त्यांच्या आनंदांत वांटेकरी होत असत. केळकरांच्या मनाची ही दिलदारी प्रशंसनीय आणि अनुकरणीय होय यांत शंका नाहीं. किंबहुना त्यांच्या सम्राटपदाला यानें विशेषच सात्विकशोभा आली, यांत शंका नाहीं.

## प्रथम श्रेणींतील निबंधकार

केळकरांच्या विविध क्षेत्रांतील वाङ्मयसेवेचें पर्यालोचन ‘ केळकर

वाढदिवस–मंडळा' नें त्यांच्या ६१ व्या वाढदिवसानिमित्त पंधरा वर्षां-पूर्वीं काढलेल्या केळकर–ग्रंथांत अनेक अधिकारी लेखकांनीं केलेलें प्रसिद्ध आहे. नाटककार, टीकाकार, कादंबरीकार, निबंधकार, इतिहासकार, तत्वविवेचक, ग्रंथकार, संपादक, चरित्रकार आणि कवि म्हणून केळकरांनीं निर्माण केलेल्या साहित्याचा यथोचित परामर्श वरील ग्रंथांखेरीज अन्यत्रहि झाला आहे. नाटकांत 'तोतयाचें बंड' आणि ग्रंथांत 'मराठे आणि इंग्रज', 'हास्य–विनोद–मीमांसा' हीं तीन रत्नें आमच्या मतें, त्यांच्या लेखनप्रभुत्वाची साक्ष दीर्घ काळ देत राहतील. पैकीं 'मराठे आणि इंग्रज' हा ग्रंथ; तसें म्हटलें तर प्रबंध वर्गांतच दाखल करणें उचित ठरेल. निबंधमालेनंतर निबंधकार म्हणून केळकरांचेंच नांव आपणांस घ्यावें लागेल. मराठी भाषेंतील पहिल्या श्रेणींतील निबंधकार म्हणून केळकरांची कीर्ति चिरकाल राहील. त्यांचे परम सुहृद् साहित्य श्रेष्ठ श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनींहि त्यांची योग्यता यथार्थपणें ओळखून निबंधमालेबरोबर केळकरांच्या लेखसंग्रहाचेंहि परिशीलन करण्याची जी शिफारस मराठी भाषेच्या आणि वाङ्मयाच्या अभ्यासकांस केली आहे, तिच्यांतील मर्म तरी हेंच. केळकर गेले, तरी केळकरवाङ्मय अनेक पिढ्या जिवंत राहील आणि ज्याचा हव्यास केळकरांनीं उत्तर आयुष्यांत अत्यंत तळमळीनें धरला होता, त्या महाराष्ट्र विद्यापीठांत त्यांचें परिशीलन मोठ्या भक्तीनें केलें जाईल यांत आम्हांस संशय नाहीं. नरसिंह चिंतामण केळकर गेले, तरी साहित्यसम्राट् केळकर अमरच राहातील.

---

# महात्माजी गेले!

# पण हिंदुस्थानला अमर करून गेले!!

## ' सकल पृथ्वी आंदोळली। धर्म गेला। '

गेल्या जानेवारी महिन्याच्या तिसाव्या तारखेस प्रार्थनेला जात असतां महात्मा गांधींच्याच एका देशबांधवानें त्यांच्यावर अघोरी अत्याचार केला आणि गांधीजींचा अंत झाला! आणि एका घटकेंत ' सकळ पृथ्वी आंदोळली। धर्म गेला! ' असा दुःखाक्रोश पृथ्वीच्या कानाकोंपऱ्यांतून उठला!! आजवर कधीं दिसलें नव्हतें असें अद्भुत दृश्य दिसलें!!!

## मनूचे अभिमानोद्गार सार्थ

या दृश्यानें गांधींची महति आणि लोकप्रियता तेवढ्याच दिसून आल्या असें नाहीं तर ज्या भारताच्या सेवेसाठीं गांधीजींनीं सतत तीस वर्षे काया कष्टविली त्या भारताला जगाच्या बाजारांत किती उच्च पद लोक देऊं लागले आहेत याचें प्रत्यक्ष प्रमाण दिसून आलें. हिंदुस्थानला बाहेरच्या सुधारलेल्या जगांत हिंदुस्थानांतल्या वाघांवरून हत्तींवरून किंवा सापांवरून ओळखण्याचा एक काळ होता. पुढें काश्मिरांतील नंदनवन, हिमालयावरील गौरीशंकर अथवा आग्रा

येथील ताजमहाल यांच्यावरून जरा जवळून त्याची ओळख होऊं लागली. पण एखाद्या देशाची खरी ओळख त्यांतील विद्यमान थोर पुरुषांच्या थोरवीची जी उंची जगांत लागते तीवरूनच जग ठरवितें. अलीकडे अलीकडे हिंदुस्थान म्हणजे रविन्द्रनाथ ठाकुरांचा देश किंवा गांधींचा देश म्हणून कौतुकानें जग हिंदुस्थानची ओळख करून घेऊं लागलें होतें! आज त्याच कौतुकाची आदरांत परिणति होऊन तेंच जग नम्र होऊन गांधींना आणि त्यांच्या भारताला श्रद्धांजलि अर्पण करीत आहे. मोठमोठीं राष्ट्रें त्यांच्या सन्मानार्थ आपलीं निशाणें उतरवीत आहेत! मोठमोठ्या राष्ट्रांचे नायक, पुढारी, विद्वान् आणि धुरीण गांधीजींच्या मृत्यूमुळें मानवतेचा आणि शांतीचा एक महान् अद्वितीय पुरस्कर्ता हरपला आणि सर्व जगाची मोठी हानि झाली म्हणून शोकोद्गार प्रकट करीत आहेत! हा केवढा चमत्कार! ही केवढी अपूर्व क्रांति! हा चमत्कार आणि ही क्रांति यांचा कर्ता महापुरुष म्हटला म्हणजे महात्मा गांधी, हें कोणाहि निःपक्षपाती माणसास मान्य करावेंच लागेल. आतां जगाच्या पटावर हिंदुस्थान पुनः अभिमानानें चमकूं लागला. ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं त्याचें नांव जगाच्या सन्माननीय पटावर दाखल झालें. आणि ता. ३० जानेवारी १९४८ रोजीं म्हणजे अवघ्या सहा महिन्यांच्या आंतच महात्माजींनीं आपलें बलिदान केलें! महात्माजी गेले! पण हिंदुस्थानला अमर करून गेले!! पूर्वीं मनूनें जो अभिमानोद्गार एकदां या भारतासंबंधानें काढला होता तो आज सार्थ होणार असा स्पष्ट रंग दिसूं लागला–'स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः।'

असा हा चमत्कार गांधीजींनीं अवघ्या तीस वर्षांत करून दाखविला. या काळांत त्यांनीं तीन युद्धें पाहिलीं. पहिलें आफ्रिकेंतील

बोअर युद्ध, दुसरें मागचें महायुद्ध आणि तिसरें परवांचें प्रलययुद्ध ! ! आफ्रिकेंतील काळांतच त्यांच्या विचारांची आणि आचारांची जुळणी झाली. त्यांची जीवननिष्ठा या काळांतच जन्माला येऊन हळूहळू परिणत झाली. आपल्या अनुभवांना 'सत्याचे प्रयोग' असें नांव त्यांनीं दिलें होतें आणि हे त्यांचे प्रयोग आफ्रिकेंत सुरू होऊन हिंदुस्थानांत विविध स्वरुपांत आणि विस्तृत क्षेत्रांत त्यांच्या आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत चालू होते.

## सर्वोदयाचा साक्षात्कार

या प्रयोगाचे कामीं त्यांस ज्या एका थोर ग्रंथाचें परिणामकारक मार्गदर्शन झालें तो ग्रंथ म्हटला म्हणजे प्रख्यात इंग्लिश ग्रंथकार रस्किन याचा 'अन्टु धिस् लास्ट' हा ग्रंथ होय. गांधींचे आफ्रिकेंतील मित्र पोलाक यांनीं 'सहज वाटेंत वाचून होईल; तुम्हांला आवडेल' म्हणून या ग्रंथाची प्रत गांधीजींना वाचावयास दिली. या प्रसंगाचें वर्णन गांधीजी स्वत: आपल्या आत्मकथेंत येणेंप्रमाणें करतात:

'आ पुस्तकने लीधा पछी हुं छोडीज न शक्यो. तेने मने पकडी लीधो !'

प्रवास चोवीस तासांचाच होता पण पुस्तक कांहीं हातचें खालीं ठेववेना. वाचल्यावर सारी रात्र त्यांना झोंप आली नाहीं आणि पुस्तकांतील विचार अंमलांत आणण्याचा निश्चय गांधीजींनीं केला. गांधीजी लिहितात:—

**'मारी जिंदगीमां तत्काल महत्त्वनो रचनात्मक फेरफार कराव्यो एवुं तो आ पुस्तकज कहेवाय.'**

आपल्या जीवनावर येवढा महत्त्वाचा परिणाम घडवून आणणाऱ्या

या पुस्तकाचें भाषांतर गांधीजींनीं **'सर्वोदय'** या नांवानें छापून प्रसिद्ध केलें.

रस्किन्च्या प्रेरणेनें 'सर्वोदया' चीं जीं तत्त्वें किंवा जे सिद्धान्त गांधीजींनीं निश्चित केले ते पुढीलप्रमाणें:—

'सर्वोदय' ना सिद्धान्तो हुं आम समज्यो:—

**१ "बधाना भलामां आपणुं भलुं रहेलुं छे."**

(सर्वांच्या कल्याणांत आपलें कल्याण सामावलेलें असतें.)

**२ "वकील तेमज वाळंद बन्नेना कामनी किंमत एक-सरखी होवी जोइए, केमके आजीविकानो हक बधाने एक-सरखो छे."**

(वकील असो कीं न्हावी असो, दोघांच्या कामाची किंमत एक-सारखी झाली पाहिजे; कारण कीं उपजीविकेचा हक्क सर्वांना एक-सारखाच आहे.)

**३ "सादुं मजुरीनुं, खेडूतनुं जीवनज खरुं जीवन छे."**

(साध्यां मजुराचें, खेडवळाचें जीवनच खरें जीवन होय.)

—मूळ गुजराती 'आत्मकथा', द्वितीय खंड, पृ. ७५.

ज्या वेळीं दृढनिश्चयी आणि कार्यकर्त्या थोर पुरुषांच्या आयुष्यांतील मूलभूत प्रेरणा निश्चित निष्ठेचें रूप पावते तीच त्यांच्या आयुष्यांतील खऱ्या साक्षात्काराची वेळ म्हणण्यास कांहीं चिंता नाहीं. इ. स. १९०४ च्या एका सकाळीं वर दिल्याप्रमाणें साक्षात्कार गांधीजींना झाला. कारण, रस्किन्च्या प्रेरणेनें गांधीजींच्या ठायीं 'सर्वोदया' चे वरील तीन स्थूल सिद्धान्त ठाम झाले. ग्रंथ वाचून झाला, पण रात्रभर झोंप आली नाहीं. पुस्तकांतील विचार अंमलांत कसे आणावे, प्रत्यक्षांत कसे उतरावे, या चिंतनांत सारी

रात्र गेली. आणि 'सवार थयुं ने हुं तेनो अमल करवाना प्रयत्नमां पड्यो.' ज्या सकाळीं हा निश्चय गांधीजींनीं केला त्या पवित्र सकाळलाच आम्ही साक्षात्काराची सकाळ म्हणतों.

रस्किन्च्या ग्रंथानें गांधींचा अन्तरात्मा जोरानें जागृत केला इतकेंच; 'सर्वोदया' चीं तत्त्वें कांहीं नवीन होतीं असें नव्हे किंवा गांधीजींनीं तीं नवीन शोधून काढिलीं असेंहि नव्हे. ते म्हणतात,

"पहेली वस्तु हुं जाणतो हतो. बीजुं हुं झांखी जोतो हतो. त्रीजीनो में विचारज न होतो कर्यो."

—आत्मकथा, द्वि. खं. पृ. ७५.

पहिलें तत्त्व गांधीजींना ठाऊकच होतें. दुसऱ्या तत्त्वाचा प्रकाशहि त्यांना स्पर्शून गेला होता. पण तिसऱ्याचा मात्र त्यांनीं यापूर्वी कधीं विचारच केला नव्हता. वास्तविक पाहतां गांधीजी म्हणतात त्याप्रमाणें "पहेलामां बीजी बन्ने समायेली छे. ए मने 'सर्वोदये' दीवा जेवुं देखाड्युं." —पहिल्या तत्त्वांत दुसऱ्या दोन्ही तत्त्वांचा समावेश होतोच. म्हणजे तात्पर्य इतकेंच कीं **'सर्वांचें कल्याण'** म्हणजेच सर्वोदय! "सर्वभूतहिते रताः" हें कांहीं नवें तत्त्व नाहीं. आमच्या धर्मग्रंथांत किंवा आमच्या साधुसंतांच्या उपदेशांत तें सर्वत्र आढळून येतें. ऐकण्यास किंवा बोलण्यास तें अत्यंत सोपें आहे आणि दिसण्यांत तर तें कमालीचें साधें आहे. 'सर्वे भद्राणि पश्यन्तु' ही आमची सहस्रों वर्षांची जुनी मंगल घोषणा आमच्या कानींकपाळीं रोज दुमदुमून राहिलेली आहे! पण ती सांगण्यास जितकी सोपी तितकीच आचरण्यास परम कठिण आहे. ती आचरतांनाच तर गांधीजींना गोळी खावी लागली!!

## गुरूचा शोध

रस्किन्चा ग्रंथ वाचून मनाचा कांहीं पालट होण्यापूर्वी गांधीजीं-

च्या मनावर ज्यांचे दृढ संस्कार झाले होते असे आणखी दोन पुरुष गांधीजींनीं सांगितले आहेत. एक काठेवाडातील कवि रायचंद अथवा राजचंद्र. हे गृहस्थ श्रीमंत व जवाहिराचे व्यापारी असूनहि परम धार्मिक होते. यांच्या शिकवणीची छाप गांधीजींवर पडली. तिचें वर्णन गांधींच्याच शब्दांत देतों:—" घणा धर्माचार्योना प्रसंगमां हुं त्यारपछी आव्यो छुं, दरेक धर्मना आचार्योने मळवानो प्रयत्न में कर्यो छे, पण जे छाप मारा उपर रायचंद्रभाईए पाडी ते बीजा कोई नथी पाडी शक्या." वारंवार गांधीजी आपल्या आध्यात्मिक शंकांचें निरसन या रायचंदभाईकडून करून घेत. हे झाले एक सत्पुरुष. दुसरे कौंट टॉल्स्टॉय् आणि त्यांचे ग्रंथ. रायचंदभाई, टॉल्स्टॉय् आणि रस्किन् या तिघांबद्दल गांधीजी लिहितात, " मारा जीवन ऊपर ऊंडी छाप पाडनार आधुनिक मनुष्यो त्रण छे!" तथापि कोणालाहि गांधींनीं 'गुरु' मानलें नाहीं. गांधी स्पष्टपणें सांगतात, " हिन्दुधर्मे गुरुपदने जे महत्त्व आप्युं छे तेने हुं माननारी छुं." 'गुरु' संस्थेवर गांधीजींचा विश्वास होता. तथापि त्यांनीं कोणाला गुरु केलें नाहीं. ते गुरूच्या शोधांतच राहिले. " मारी ए शोध आज पण चालु छे."

गांधीजींच्या मनाची घडण कसकशी होत गेली याचा पुष्कळ उलगडा गांधीजींनीं आपल्या ' आत्मकथेंत जागजागीं केलेलाच आहे. टॉल्स्टॉय् किंवा रस्किन् प्रभृति पाश्चात्य नीतिपुरस्कर्त्यांचे ग्रंथ किंवा बायबल, कुराण प्रभृति अन्य धर्मग्रंथ, तसेंच भागवत आणि भगवद्गीता इत्यादि भारतांतील धर्मग्रंथ यांचें वाचन व मनन गांधीजींनीं लक्षपूर्वक केलें. या सर्व ग्रंथांत भगवद्गीता (हुं सर्वोत्तम ग्रंथ गणुं छुं!) सर्वोत्तम असा गीतेबद्दल गांधीजींचा अभिप्राय बनला; आणि तोहि

गीतेचा आर्नोल्डकृत इंग्रजी तर्जुमा वाचून ! पुढें मग मूळ भगवद्गीता हा ग्रंथ गांधीजींचा एक नेहमींच्या पाठांतला ग्रंथ होऊन राहिला !

## भलेपणा हाच पुरुषार्थ

ग्रंथ वाचूनच गांधीजी राहिले नाहींत. मनावर ठसलेल्या तत्त्वांचा अनुभवहि ते आस्थापूर्वक घेत राहिले. या सर्व अनुभवांचा रोख 'सर्वोदया' वरच होता. सर्वोदय व्हावा अशी जर इच्छा असेल तर सर्वांच्या मनांत भलाईची, कल्याणाची प्रेरणा जागृत झाली पाहिजे. जर स्वतःच्या ठायीं ही कल्याणाची मंगल प्रेरणा जागृत झाली तर मग दुसऱ्याच्या चित्तांतहि ती जागृत होऊं शकेल. यास्तव आपल्या ठिकाणीं ही प्रेरणा जागृत करून दुसऱ्याच्या मनांतहि तीच ज्योत पेटविण्यासाठीं प्रथम आपणच भलेपणा अंगीं बाणवून घेतला पाहिजे. रामदासस्वामींनीं '**भलेपणाचा जीर्णोद्धार**' करावा म्हणून उपदेश केला आहे. ईश्वरावर दृढ श्रद्धा, नम्रता, सत्यपूजा, त्याग इत्यादि साधनसंपदेची जोड आपण करून घेतल्याशिवाय आपणांस हा भलेपणाचा जीर्णोद्धार करतां येणार नाहीं असा गांधीजींना दृढ अनुभव आला. या भलेपणालाच गांधी पुरुषार्थ समजत. लोकमान्यांना उत्तर देतांना गांधीजींनीं म्हटलें आहे कीं, "Purushartha is nothing but a desperate attempt to become Sadhu (साधु) i. e. to become gentleman in every sense of the term"— ('Young India' by S. Ganesan, page 784.) म्हणजे गांधीजींच्या मतें सर्वार्थानें वा सत्यार्थानें खरा सभ्य पुरुष होणें म्हणजेच साधु होणें होय. आणि हाच त्यांच्या मतें परम पुरुषार्थ होय.

हा परमपुरुषार्थ, हा भलेपणा, ही सभ्यता म्हणजे सत्यपूजा होय. सत्य हाच ईश्वर होय. 'न्याय तो देव जाणावा। अन्याय दैत्य

बोलिजे ॥' इत्यादि श्रीसमर्थांचीं वचनें या प्रसंगीं आठवल्याशिवाय राहत नाहींत. ही सत्यपूजा करणें हाच गांधीजींच्या जीवनांतील ह्व्यास, त्यांचें मुख्य सूत्र.

## सकलजीवनव्यापी साधना

पण ही सत्यपूजा किंवा ही ईश्वरसेवा करण्यासाठीं गांधीजींनीं साधना जरी केली तरी ती रानावनात जाऊन, लोकांना सोडून केली नाहीं; किंबहुना लोकजीवन संपन्न आणि शुद्ध करणें हीच त्यांनीं ईश्वरसेवा मानली. लोकांचें '**ऐहिक**' घड करणें हाच त्यांचा ह्व्यास टरला. आणि हा ह्व्यास पूर्ण करण्यासाठींच त्यांना जीवनाची सर्व क्षेत्रें व्यापणें आवश्यक वाटलें.

ते आपल्या 'आत्मकथे' च्या या उपसंहारांत हें रहस्य प्रकट करतांना लिहितात:—

**"सत्यथी भिन्न कोई परमेश्वर होय एवुं में नथी अनुभव्युं.**

**सत्यमय थवाने सारु अहिंसा एज एक मार्ग छे....**

**मारी अहिंसा साची तोये काची छे, अपूर्ण छे........**

तेथी मारी सत्यनी झांखी....सूरजना एक किरणमात्रना दर्शनरूपज छे. एनूं संपूर्ण दर्शन संपूर्ण अहिंसा विना अशक्य छे. ............

**आवा व्यापक सत्यनारायणना प्रत्यक्ष दर्शननें सारु जीवमात्रनी प्रत्ये आत्मवत् प्रेमनी परम अवश्यकता छे. अने ते करवाने इच्छनार मनुष्य जीवनना एक पण क्षेत्रनी बहार नथी रही शकतो. तेथील सत्यनी मारी पूजा मने राज्यप्रकरणमां खेंची गई छे.**

—— आत्मकथा, द्वितीय खंड, पृ. ३७८—३७९.

" धर्मने राज्यप्रकरणनी साथे संबंध नथी एम कहेनार धर्मने जाणतो नथी एम कहेतां मने संकोच नथी थतो, एम कहेवामां हुं अविनय नथी करतो. आत्मशुद्धि विना जीवमात्रनी साथे ऐक्य नज सधाय....पण आ शुद्धिनो मार्ग विकट छे....मारे हजू विकट मार्ग कापवानो छे—तेने सारु मारे शून्यवत् बनवानूं छे........ "

येथवर गांधीजींच्या वचनांच्या आधारें त्यांच्या निष्ठेची रूपरेषा आम्हीं दाखविली आहे. आफ्रिकेंत त्यांनीं सुमारें वीस वर्षें आपली ही निष्ठा अनुभवानें आणि प्रयोगांनीं विकासित केली. त्यांच्या ठिकाणीं ती दृढ झाली आणि पुढें इ. स. १९१५ पासून तीसबत्तीस वर्षें त्यांनीं याच निष्ठेच्या बळावर भारताची अशी अपूर्व सेवा केली कीं साऱ्या दुनियेनें त्यांचा एकमुखानें जयजयकार केला !

## गांधी आणि टिळक

गांधीजी अखेरीस हिंदुस्थानांत आले त्या वेळीं हिंदुस्थानांत सर्वांत प्रभावी आणि लोकप्रिय असे जनसेवक लोकमान्य टिळक हेच होते. दीर्घकालीन कारावासांतून ते परत येतात तोंच महायुद्धाचा डोंब उसळलेला होता! या नव्या परिस्थितीला अनुसरून टिळकांनीं आपल्या जनसेवेच्या कर्मयोगाची दिशा ठरविली. याच वेळीं गांधीजी- हि हिंदुस्थानांत येऊन पोंचले. या दोघां धुरंधर लोकसेवकांची जोडी टिळकांच्या मृत्यूपर्यंत हिंदुस्थानला लाभली. उभयतांना लवकरच दिसून आलें कीं त्यांच्या मूलभूत निष्ठांत महत्त्वाचा भेद आहे. या 'टिळक–गांधी' प्रकरणावर इतकीं भाष्यें झालेलीं आहेत तरीहि गांधीजींच्या पश्चात् त्या विषयाची फेरतपासणी करणें अवश्यच होईल. हीं भाष्यें अनेक झालीं असलीं तरी त्यांत निर्भीड आणि निःपक्षपाती भाष्यें कमीच आढळतील. परवांच गांधीजींच्या वधोत्तर इंग्लंडमधील

'मँचेस्टर गार्डियन्' सारख्या विचारप्रधान पत्रांत जें मतप्रदर्शन करण्यांत आलें आहे तें मामुली पद्धतीचें म्हणतां येणार नाहीं. अशीं विचाराला चालना देणारीं भाष्यें आपणांस यापुढील काळांत अधिक उपयोगी पडतील.

टिळक आणि गांधी यांच्या मूलभूत निष्ठांत भेद होता ही गोष्ट उभयतांच्या लेखांवरूनच सिद्ध आहे. प्रत्यक्ष गांधीजींनींच I know that we *fundamentally differed* ( Young India, page 680) असें स्पष्ट सांगितलें आहे. "He ( टिळक ) used to challeenge my interpretation of life " Young India, page 680. ). असा हा मूलभूतच मतभेद होता. गांधींची 'निष्ठा' कशा प्रकारची होती हें मागें सांगितलेंच आहे. 'अक्रोधेन जिने क्रोधम्' ही गांधींची निष्ठा आपणांस मान्य नसून 'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्' ही श्रीकृष्णांची शिकवण आपणांस मानवते असें टिळकांचें म्हणणें. ( टिळक–पत्र, 'यंग इंडिया,' पृ. ७८४. ) या दोन मूलभूत निष्ठांमधील वाद किंवा भेद हा कांहीं नवा नाहीं. "लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा" या गीतावचनांतहि या पुरातन भेदांचा निर्देश आहे. टिळकांना उभय निष्ठांची महती मान्य होती. "Both methods are equally honest and righteous" असें आपलें मत व्यक्त करून त्यानीं गांधीजींचा अर्धा दावा स्पष्टपणें मान्य केलाच आहे; पण ते म्हणतात, "But the one is more suited to this world than the other." या "व्यवहारी जगांत या दोहोंपैकीं आपण पसंत केलेला अधिक उपयुक्त" असा त्यांचा अभिप्राय होता.

गांधींनीं यावर उत्तर दिलें कीं, 'अक्रोधेना'दि हें बुद्ध–वचन ( "Eternal Principle" ) चिरंतनतत्त्ववाचक असून 'ये यथा मां०' हें वचन त्याच तत्त्वाचा पालनमार्ग सांगत आहे. 'ये यथा मां०' च्या

अनुरोधानें 'शठं प्रति शाठ्यम्' हा उपदेश मान्य करण्यास गांधीजी यत्किंचित्हि तयार नव्हते; 'शठं प्रत्यपि सत्यम्' हा त्यांचा बाणा होता. टिळकांनीं या सत्यासत्याची सूक्ष्म मीमांसा करतांना पुढील उदाहरण घेतलें होतें:— एक गाय पळते आहे व तिला मारण्यासाठीं पारधी मागें लागले आहेत. वाटेंत एका ऋषीचा आश्रम आहे. 'गाय कोणत्या रस्त्यानें गेली ?' असें पारध्यांनीं विचारलें तेव्हां कोडें पडलें. खरें सांगावें तर गाय मरणार, खोटें सांगावें तर पाप लागणार ! या धर्मसंकटांत गांधी सत्यच सांगण्याचा आग्रह धरणार तर टिळक 'पंचानृतान्याहुरपातकानि' या न्यायानें या ठिकाणीं खोटें सांगणें पाप नसून तसें करून गाईचा जीव वांचविणें हेंच योग्य व धर्म्य होय असें म्हणणार ! गांधी खरें सांगून आपला जीव पारध्यांना अर्पण करण्यासहि कचरणार नाहींत ! येथें हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं **गाईचा जीव वांचविणें** हा प्रधान व अंतिम उद्देश मात्र उभयतांनाहि मान्यच होता. तो उद्देश धर्म्य होता. साधनांतच काय तो मतभेद ! एक, पारध्याच्या अंतःकरणाचा पालट घडवून आणण्यासाठीं प्रसंगीं प्राणहि देणार; दुसरा, त्याच्या पापेच्छेचें प्रायश्चित्त त्याला आपल्याच युक्तीनें देणार ! एक गाईचे प्राण रक्षून आपलेहि प्राण रक्षिणार ! दुसरा आपले प्राण देऊन गाईच्या प्राणरक्षणाचें कर्तव्य ईश्वरावर सोंपविणार !

वरवर दिसतो तितका हा निष्ठाभेद सोपा व साधा नाहीं. जों जों विचार करावा तों-तों आपलें मन व बुद्धीहि गुंगवून टाकल्याशिवाय राहणार नाहीं. सिंहगडावर गांधी व टिळक दोघांचाहि मुक्काम असतां या विषयावर उभयतांत कसून व मनमोकळी चर्चा झाली. त्या वेळीं सत्य आणि असत्य ह्या कल्पना सापेक्ष कशा आहेत हें टिळकांनीं प्रतिपादिलें. यावरून टिळकांना मायावादाच्या तळाशीं जावें लागलें हें

उघड आहे आणि मग तेथें कांहीं गांधींना त्यांना अडवितां आलें नाहीं. ('यंग इंडिया' पृ. ६८० पाहा.) हा तात्त्विक मतभेद मिटवण्यासारखा नव्हता आणि मिटलाहि नाहीं. तथापि उभयतांचा प्रेमादर यामुळें यत्किंचित्‌हि कमी झाला नाहीं. टिळक जर आणखी जगते तर जगाला एक अद्भुत दृश्य दिसलें असतें. टिळकांचा आणि गांधींचा मोठा कटु विग्रह झाला असता इत्यादि कल्पना आम्हांला निर्मूल वाटतात. अखेरचें साध्य जें 'जनहित' तें दोघांचेंहि एकच असल्यानें आपापल्या मार्गानें पण शक्य तितका मेळ ठेवून उभयतांनीं भारतीय जनतेची शक्ति आणि आत्मप्रत्यय यांची वाढच केली असती.

गांधींचा अपूर्व कर्मयोग, त्यांची अद्वितीय श्रद्धा आणि त्यांचे अद्भुत प्रयत्न यांपुढें कोणीहि नम्रच होईल. ते विश्ववंद्य कोटींतील एक अग्रेसर पुरुष होत यांत कसलीच अतिशयोक्ति नाहीं; पण प्रश्न मात्र मनांत आल्याशिवाय रहात नाहीं कीं, "समजा, परवांचें महा-युद्ध झालें नसतें, तर गांधींना आपल्या मार्गानें हिंदुस्थानचें स्वातंत्र्य विनायुद्ध साधण्याची कितीशी शक्यता होती? उलट त्याच स्थितींत टिळकांनीं तरी देशाची इंग्रजांशीं प्रत्यक्ष युद्धाला उभें राहण्याइतपत तयारी आपल्या आयुष्यांत केव्हां व कशी केली असती?"

## भ्याडपणापेक्षां हिंसाहि श्रेष्ठ

येथें वाचकांस थोडी सावधगिरीची सूचना दिली पाहिजे. पुष्कळां-ची अशी समजूत आहे कीं गांधींनीं स्वतंत्र भारतांत यौद्धिक यंत्रणा तावडतोब मोडून टाकिली असती. तात्विक उत्तर म्हणून तसले उद्गार गांधींकडून थोडे बेसावधपणें एका प्रार्थनामंदिराचे प्रवचनाच्या निमित्तानें त्यांना पकडून चर्चापरिषदेंत विलायतेंत कांहीं धूर्तांनीं काढून घेतले होते; तथापि गांधींनीं तसें त्याच वेळीं केलें असतें कीं ज्या

वेळीं सर्व देश म्हणजे त्यांतील बहुसंख्य प्रजा त्यांच्या प्राणार्पणीं अहिंसेनें निश्चित उभी राहील अशी त्यांची खात्री पटली असती! तो काळ ताबडतोब आला आहे असें वाटतें तर गांधींनीं १५ ऑगस्टलाच प्राणांतिक उपवास पुकारून साऱ्या भारतीय फौजांना रजा देवविण्याचा हट्ट धरला असता; पण उलट त्यांनीं भारत-सरकारनें काश्मीरांत फौजा पाठविल्या या कृत्याचें समर्थनच केलें. त्यांचे प्रत्यक्ष उद्गारहि या प्रकरणीं यथार्थ निर्णय करण्यास सादर करतां येतील.

एका ठिकाणीं ( १९१९–१९२२ ) ते म्हणतात,

(i) "For under Swaraj too I would not hesitate to advise those who would bear arms to do so and fight for the country." (Young India, Page 265.)

(ii) "I do believe that where there is only a choice between cowardice and violence, I would advise violence." (Young India, Page 260.)

(iii) "*Hence also do I advocate training in arms for those who believe in the method of violence. I would rather have India resort to arms in order to defend her honour than that she should, in a cowardly manner, become or remain a helpless witness to her own dishonour.*" ( Young India, Page 260. )

पाकिस्तानी मुसलमानांविरुद्ध युद्ध पुकारण्यासहि गांधीजींनीं संमति दिली असती हें यावरून स्पष्ट होईल. तथापि लष्करी युद्धाचा निश्चय करतांना वास्तविक बलाबलाचा आणि सर्व परिणामांचा शांतपणें विचार करून मगच अखेर निर्णय करावा लागतो. कितीहि प्रक्षोभक कारणें घडलीं तरीहि वेळीं सबुरी करणें भाग पडतें. हिंदुस्थानच्या

लष्करी तज्ज्ञांचा खरा सल्ला व अंदाज या प्रकरणीं काय होते हें स्पष्ट व साधार कळल्याशिवाय अखेरचें मत बनविणें योग्य होणार नाहीं. तें कांहींहि असो, तूर्त गांधीजींचें तात्त्विक म्हणणें या प्रकरणीं काय पडलें असतें तें त्यांच्या सुमारें पंचवीस वर्षं पूर्वींच्या ( इ. स. १९२० च्या ) उद्गारांवरून स्पष्ट होतें:—

( iv ) "Let me not be misunderstood. I want both the Hindus and Mussalmans to cultivate the ccol courage to die without killing. But if one has not that courage, *I want him to cultivate the art of killing* and being killed, rather than in a cowrdly manner flee from danger."

गांधीजींच्या वडील चिरंजीवांनीं एकदां त्यांना प्रश्न केला होता, "इ. स. १९०८ सालीं जेव्हां तुमच्यावर प्राणघातक हल्ला झाला तेव्हां मी जवळ असतों आणि ( १ ) भयानें पळून गेलों असतों किंवा ( २ ) तुमच्या रक्षणार्थ शारीरिक बळाचा उपयोग केला असता तर तुम्हीं काय पसंत केलें असतें ?" गांधी साफ म्हणतात,

"I told him that it was his duty to defend me even by using violence."

## हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचें श्रेय कोणाला ?

आम्हीं आतां स्वतंत्र तर झालों. त्यापूर्वीं आमचा मुख्य झगडा गांधीजींच्या नेतृत्वाखालीं त्यांच्या अहिंसात्मक पद्धतीनेंच झाला. युद्ध-मति पक्षाला कांहीं देशांतील **जनता आपल्या बाजूस घेऊन** स्वातंत्र्ययुद्ध लढविण्याची प्रत्यक्ष सिद्धता करतां आली नाहीं. तें काम अवघडच होतें. अशस्त्र प्रजेला अशस्त्र युद्ध करण्याला गांधींनीं उद्युक्त केलें व या युध्दाचें अटळ फळ म्हणून इंग्रजांनीं हरून आणि

आमच्या ' चले जाव ' ची दरडावणी ऐकून येथून कूच केलें असा अभिमान पुष्कळच वेळां प्रकट केला जातो. नीट विचार केला असतां त्यांत कांहीं तथ्य निःसंशय आहे; पण संपूर्ण तथ्य मात्र नाहीं. महा-युद्धामुळें इंग्रजांची परिस्थिति इतकी बिघडली कीं अशांत आणि विरोधी अशा हिंदुस्थानचें घोंगडें दूर फेंकून जाण्यांतच शहाणपणा आहे हें त्यांनीं ओळखलें आणि सर्व अपमान गिळून, मनांत सोसून, मिळवितां येईल तेवढें दिखाऊ श्रेय पदरीं घेऊन चांगुलपणानें आणि शांतपणानें येथून काढता पाय घेतला. हें इंग्रजांचें श्रेय इंग्रजांना न्यायानें दिलेंच पाहिजे. कै. श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं यांतला न्याय प्रांजलपणानें मान्य केला होता आणि इंग्रजांचा वांटा इंग्रजांच्या पदरीं घातला होता. गांधीजीहि इंग्रजांचें श्रेय इंग्रजांस देण्यास बिलकूल कचरत नाहींत वा भलतेंच श्रेय आपणाकडे संपूर्णपणें ओढून घेत नाहींत. श्रेय त्रिवर्गाचें आहे—इंग्रजांचें, आमचें आणि गांधीजींचें. मानाचा चौथा वांटेकरी आणखी एक धरला पाहिजे व तो म्हटला म्हणजे श्री. नेताजी सुभाषचंद्र. गांधीजींचा आशीर्वाद मागूनच त्यांनीं सेना उभी केली यांतलें मर्म लक्षांत घेण्यासारखें आहे.

## पॉल रिचर्डची पंचवीस वर्षांपूर्वींची भविष्यवाणी

हा वांटा किंवा हें श्रेय इंग्रजांना आज दिलेंच पाहिजे; पण असा प्रसंग येईल असें भविष्य गांधीजींचे एक मित्र प्रख्यात एम्. पॉल रिचर्ड यांनीं १९२२ त म्हणजे पंचवीस वर्षांपूर्वीं ( यंग इंडियांत ) केलें होतें ही किती कौतुककारी गोष्ट वाटते ! पॉल रिचर्ड यांचा हा छोटा लेख पुनःपुन्हां वाचावा इतका सुंदर आहे. त्यांत टिळक व गांधी या उभय थोर पुरुषांच्या थोरवीचें मननीय मापन रिचर्ड यांनीं केलेलें आहे. त्यांची भविष्यवाणी अशीः—

"As for freedom of India I have full faith in it. I have unceasingly said that it will come, that it is coming, but perhaps by other ways. *It may come neither by violence nor by non-violence. It may come from England itself,* even as it came to her at the fall of the Roman Empire. For, great changes are impending in England, in Europe, in the whole world. The ways of God are most often the most unexpected ones. It is this way that I expect. What I have always said is that if the national movement does not bring freedom to India, it prepares India for freedom. *It leads to the awakening of the masses; this awakening of the masses to social chaos; this chaos to new creation; this new creation to greatness*—and this greatness will make India ready for and worthy of the freedom which comes to her."

पॉल रिचर्डची ही पंचवीस वर्षांपूर्वीची भविष्यवाणी अक्षरशः खरी झाली आहे. आमच्याकडून युद्ध होऊन स्वातंत्र्य कांहीं खेंचून आणलें गेलें नाहीं; आमच्या अहिंसक प्रतिकाराला किंवा युद्धाला श्रेय असलें ( आणि तें निःसंशय आहे ) तरी तें मर्यादितच; अखेर स्वातंत्र्याचें उदक इंग्लंडच सोडील असें पॉल रिचर्ड यांनीं म्हटलें होतें व तसेंच झालें. इंग्लंडनेंच तारीख ठरवून तें पुण्य जोडलें !

## 'प्रचंड जनताजागृती' च्या श्रेयाचा मानकरी

आमच्या चळवळी झाल्या आणि महात्मा गांधीजींनीं चाळीस कोटी जनतेचीं हृदयें हलवून सोडलीं ! येवढी प्रचंड जागृति त्यांनीं केली ! या श्रेयाचा सर्वाढ्य वांटेकरी आणि मानकरी तोच महापुरुष ! 'या प्रचंड जनजागृतींतून प्रथम सामाजिक अराजक उद्भवेल !'

आज गांधीजींच्या वधोत्तर हें अराजक आम्हीं प्रत्यक्षच अनुभवीत आहों. आणि यापुढें त्याचे नवे नवे पापुद्रे आणि पडदे खुलतील आणि सारी खरूज, सारे खवडे आणि नायटे बाहेर पडतील!! मग मात्र आमचें शरीर दिव्य आणि सुंदर होईल. तेजस्वी आणि जगाला मार्गदर्शक असा नवा भारतीय समाज जगाच्या अग्रभागीं झळकेल— मात्र आज नाहीं, आतां नाहीं—तर उद्यां! महत्पद तेंच!! त्या अमरपदावर आमचा हात धरून आम्हांला बसवणारा आणि आम्हांला कृतार्थ करणारा कोण? तर ज्याच्या नांवानें 'अनामिका सार्थवती बभूव' असें म्हणावें तो, एका वाट चुकलेल्या देशबांधवाच्या गोळीला ज्याचा देह बळी पडला असा सर्ववंद्य महात्मा!!!

## हिंदुधर्माचा खरा मार्गदर्शक

असा हा महात्मा स्वतःला 'सनातनी हिंदु' म्हणवी, हें सकल हिंदु समाजाचें केवढें भाग्य! हिंदु समाजाला या महात्म्यानें पुनः सजीव आणि अमर केलें. अवताराचें मर्म सांगतांना तुकोबांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे,—

**सुख ठेवी आम्हांसाठीं।**
**दुःख आपणची घोटी॥**

या कोटींतला हा धन्य पुरुष म्हणतो, —

"I call myself a Sanatani Hindu because,

(i) I believe in the Vedas, the Upanishads, the Puranas and all that goes by the name of Hindu Scriptures and therefore in avatara and rebirth.

(ii) I believe in Varnashrama Dharma in a sense, in

my opinion, strictly Vedic but not in its present, popular. and crude sense.

( iii ) I believe in the protection of the cow in its much larger sense than the popular.

( iv ) I do not disbelieve in idol worship."

खऱ्या विश्वव्यापक हिंदु धर्माला जर पुनः जगाचें मार्गदर्शन करावयाचें असेल तर महात्मा गांधीजींनीं संपादन केलेले बहुमोल अनुभव, जोडलेली दीर्घ तपस्या आणि जोपासलेली सर्वोदयाची तीव्र आकांक्षा यांचा बहुत उपयोग होईल. सर्व जगाची दृष्टि फिरवून त्यांनीं भारताकडे लावली, ती तेथें स्थिर करणें आपणांकडे आहे. कारण, आतां—महात्माजी गेले !—पण हिंदुस्थानला अमर करून गेले ! !

# ६. लो. टिळकांचा ' बेमालूम ' सांधेकार गेला !

कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांचें देहावसान गेल्या शके १८७० श्रावण वद्य ६ ( ता. २६–८–४८ ) मितीस मुंबई मुक्कामीं त्यांच्या नव्या कर्मक्षेत्रांत झालें ! एक थोर आणि कर्तबगार संपादक, निष्ठावंत देशभक्त आणि पराक्रमी नाटककार हरपला म्हणून, हें वृत्त कळतांच सर्वत्र एकमुखानें शोकाक्रोश झाला ! खरोखर गेल्या कित्येक महिन्यांत आपण एकामागून एक अशा जुन्या पिढींतल्या थोर पुरुषांस मुकत चाललों आहों ! हे जुने दुवे निखळून पडल्यामुळें आपलीं मनें विषण्ण झाल्याशिवाय कशीं राहतील ?

तसें म्हटलें तर काकासाहेब खाडिलकर यांची प्रकृति अलीकडे कित्येक वर्षे रोगजर्जर झालेली होती; आणि तशांतच त्यांचेवर कौटुंबिक दुःखांचेहि कित्येक दुर्धर आघात झाले होते. अशा कठीण स्थितींतहि त्यांनीं आपल्या मनाची खंबिरी सोडली नाहीं आणि तत्त्वचिंतनानें, धैर्यानें दुःखाचे आवेग सहन केले. अखेर या कठोर झगड्यांत त्यांचा अंत झाला ! लौकिक दृष्ट्या पाऊणशें वर्षांचें त्यांचें वय असल्यामुळें हें कांहीं अकाल–निधन म्हणतां येणार नाहीं. तथापि आपल्याला प्रिय वाटणारी व्यक्ति आपल्यांतून कायमची गेल्याची

जाणीव होऊन होणाऱ्या दुःखाचे चटके मनाला आंतून पोळत राह-णारच!

## काकासाहेबांच्या लेखणीची पहिली सलामी

काकासाहेब भाग्यवान् खरे; कारण, गेल्या पिढींतल्या सर्वश्रेष्ठ अशा लोकमान्यांसारख्या थोरांच्या संगतींत राहून देशसेवा करण्याचा अपूर्व सुयोग काकासाहेबांना तरुणपणींच लाभला! काकांच्या एका परीक्षणात्मक लेखामुळें टिळकांचें लक्ष त्यांचेकडे गेलें आणि त्यांनीं त्यांची आपल्या 'केसरी'साठीं निवड केली. काकांच्या आधीं थोडेच दिवस तात्यांची निवड आणि योजना टिळकांनीं केली होती. केळ-कर आणि खाडिलकर या दोन तरुणांची 'सहकारी' म्हणून टिळ-कांनीं केलेली निवड किती पारखीची ठरली हें जगजाहीरच आहे.

डे. ए. सोसायटीच्या कांहींशा मर्यादित क्षेत्रांतून अधिक व्यापक क्षेत्रांत टिळक हिरीरीनें कामाला लागून कित्येक वर्षें झालीं होतीं. 'आधीं सामाजिक कीं आधीं राजकीय?' असले वाद संपवून टिळकांना जनतेचें लक्ष आपणांवर केंद्रित करून घेण्यांत वाढतें यश मिळूं लागलें होतें. लोकहितवादींची जुनी पिढी लुप्त होत चालली होती. नवीन पिढींतले टिळकांचे आगरकर—आपट्यांसारखे उमदे उमदे सहकारी अल्पवयांत मृत्यूला बळी पडले होते. दुष्काळा-ची भीषण छाया देशावर पडून लोकांची अस्वस्थता वाढत होती. त्यांतच प्लेगसारख्या नवीनच लोकसंहारक रोगाचा प्रादुर्भाव झाला!

प्रथम गणेशोत्सव आणि त्याच्या जोडीला शिवाजीस्मारक आणि शिवाजीउत्सव या कल्पना हातीं धरून टिळकांनीं जनताजागृतीचीं चक्रें वेगानें चालू करण्यासाठीं कंबर कसली होती. याप्रमाणें टिळक आपल्या सार्वजनिक आयुष्याची नवी पायरी चढूं लागले होते.

आणि त्यासाठींच त्यांना हुषार आणि कर्तबगार अशा तरुण सह-कार्‍यांची गरज होती. त्यांची शोधक नजर केळकरखाडिलकरांकडे वळून सफळ झाली. खाडिलकरांच्या लेखणीचें पाणी 'राष्ट्रीय महोत्सवांच्या आवश्यकते'च्या प्रतिपादनाच्या सलामीनें केसरींतून सर्वांच्या प्रत्ययास आलें!

लवकरच प्लेगप्रतिबंधक उपायांचा जुलूम झाला व प्रजेचा असतोष भडकला! रँडसाहेबांचा खून झाला. चापेकरबंधूंच्या तरुण मंडळाचा असा तडाखा बसतांच सरकारी दडपशाहीला जोर आला आणि तिची धग केसरी आणि टिळक यांनाहि लागली. टिळकांवर तुरुंगांत खडी फोडण्याचा प्रसंग ओढवला! असंतोष आणखी वाढला! हा सर्व प्रसंग उभ्या हिंदुस्थानांत अभिनव आणि भयंकर धक्का देणारा असा होता. या कठिण प्रसंगांत केसरीची नौका तिची अब्रू संभाळून पुढें ढकलीत नेणें हें एक महाकर्म होतें आणि तें यशस्वी करण्याची अवघड कामगिरी केळकर व खाडिलकर या टिळकांनीं नुकत्याच जोडून घेतलेल्या तरुण सहकार्‍यांवर पडली. ही या तरुणांच्या कसोटीची वेळ होती. त्यांचें कौशल्य आणि धैर्य हीं कसाला लागणार होतीं. भाग्याची गोष्ट अशी कीं या दिव्यांतून ही जोडी सहीसलामत बाहेर पडली; येवढेंच नव्हे तर, पसंतीची शाबासकी खुद्द टिळकांकडून 'पुनश्च हरिः ॐ' हा मंत्रोच्चार करतांना मिळाली. 'बेमालूम सांधा जुळविला!' म्हणून टिळकांनीं या बहाद्दरांची मोकळ्या मनानें पाठ थोपटली! यशाचा सिंहगड या तानाजी—सूर्याजींनीं पहिल्या झटक्यास सर केला! आज हे दोन्ही बहाद्दर लेखणी-वीर एका पाठोपाठ एक असे आपल्यांतून निघून गेले! त्यांच्या पराक्रमाचें स्मरण आणि मनन करणें हें आपलें पहिलें कर्तव्य होय.

याप्रमाणें ही जोडी जी एकदां आखाड्यांत उतरली, ती अखेर-

पावेतों आपलें कार्य वाढत्या यशानें करीत राहिली. दोघेहि एकाच आखाड्यांतले खरे, पण दोघांनींहि आपापलें वैशिष्ट्य प्रगट केलें. दोघेहि नामांकित वृत्तपत्रकर्ते, तसेच नामवंत नाटककर्ते म्हणून त्या काळीं दोन्ही सृष्टींत चमकले आणि दोघांनींहि आपापलें आघाडीचें स्थान सतत टिकवून धरलें. हीं त्यांचीं महनीय यशें त्यांनीं कशीं मिळविलीं, वाढविलीं आणि टिकविलीं या बाबींचें चिंतन त्या वाटेनें जाणाऱ्या पुढिलांस खचित् लाभप्रद आणि मार्गदर्शक झाल्याशिवाय राहणार नाहीं.

काकासाहेबांच्या पाऊणशें वर्षांच्या आयुष्याचे तीन स्थूल आणि सारखे टप्पे सहज पाडतां येतात. त्यांचा जन्म इ. स. १८७२ सालचा. तेथून पहिला पंचविशीचा टप्पा १८९७ ला संपतो. याच टप्प्यांत आपला विद्याभ्यास संपवून, पदवी मिळवून आणि आपल्या लेखणीची व विचारांची चमक ' विविधज्ञान—विस्तारां ' तून दाखवून त्यांनीं ' केसरीं 'त प्रवेश मिळविला आणि पहिल्याच झटक्यास टिळकांसारख्यांकडून ' बेमालूम ' सांधेकार म्हणून मानाचें आणि यशाचें प्रशस्तिपत्र प्राप्त करून घतलें.

पहिल्या पंचविशीनंतरची दुसरी पंचविशी ( १८९७–१९२२ ) काकासाहेबांनीं साधारणपणें ' केसरी 'च्या सेवेंतच घालविलीं असें म्हटलें असतां चालेल. कारण, त्यांनीं आपला स्वतंत्र ' नवा काळ ' १९२३ त सुरू केला. १९२० पर्यंत ते ' केसरी 'शीं संबद्ध होतेच. त्यानंतर कांहीं दिवस त्यांनीं मुंबईत टिळकपक्षाच्याच ' लोकमान्य ' दैनिकाचे संपादक म्हणून काम केलें. परंतु या घटनेमुळें आम्ही ठरविलेल्या दुसऱ्या पंचविशीचा हिशेब चूक ठरण्यासारखा नाहीं.

## लो. टिळकांशीं एकात्मता साधण्याचा प्रयत्न

या दुसऱ्या पंचविशींत टिळकांनीं सुरू केलेल्या विविध राष्ट्रोद्धारक चळवळींचें तेज वाढत गेलें. वंगभंगाच्या चळवळीचा उठाव टिळकांनीं महाराष्ट्रांत जोरानें केला. त्यांतूनच स्वदेशी, बहिष्कार, स्वावलंबन आणि राष्ट्रीय शिक्षण ही चतु:सूत्री जन्मास आली. नवा राष्ट्रीय पक्ष जोमांत आला. टिळक त्यांचे सर्वाग्रगण्य पुढारी म्हणून 'लोकमान्य' पदवीला पोंचले. नोकरशाही हादरून गेली. पुन: दडपशाहीला जोर आला; पुन: लोकमान्य टिळकांना शिक्षा झाली. पण या वेळची शिक्षा मागच्या शिक्षेपेक्षांहि उग्र होती. हद्दपारी आणि तुरुंगवास यांचा एक नवाच खोडा टिळकांच्या पायांत नोकरशाहीनें अडकविला. टिळकांना १८९७ सालीं आणि पुन: १९०८ सालीं ज्या शिक्षा भोगाव्या लागल्या त्यांना आपलेच लेख कारणीभूत झाले ही रुखरूख काकासाहेबांच्या मनाला जन्मभर खात राहिली. परंतु या घटनेमुळें आपलें व्रत पूर्वीपेक्षांहि चिकाटीनें चालविण्याचा त्यांचा निश्चय मात्र अधिक दृढ झाला.

जसजसें राष्ट्रीय चळवळीला तेज चढलें तसतशी केसरींतून खाडिलकरांच्या लेखणीची धारहि वाढत गेली. टिळकांच्या सहवासांत येण्यापूर्वी आपणाला 'केसरी' या अक्षरांचा स्वप्नांतहि साक्षात्कार झाला अशी स्वत: खाडिलकरांनींच साक्ष भरली आहे; ही त्यांची श्रद्धेची बैठकहि शेवटपर्यंत कायम राहिली; म्हणूनच त्यांनीं वार्धक्यांत आपल्या सांगली गांवीं एक दत्तमंदिर उभें केलें आणि वेदोपनिषदांच्या तत्त्वचिंतनांत ते गढून गेले.

खाडिलकरांनीं टिळकांची विचारसरणी तशीच शिकवण आपल्या ठिकाणीं पक्की मुरविण्याचा अगदीं श्रद्धापूर्वक प्रयत्न केला असावा असें दिसतें. वेद, उपनिषदें, महाभारत इत्यादि आमच्या प्राचीन

भारतीय संस्कृतीचे ग्रंथ लक्षपूर्वक अभ्यासण्याविषयीं टिळकांचा आग्रह असे आणि हा आग्रह खाडिलकरांनीं मनापासून अंमलांत आणण्याचा कसून प्रयत्न केला. या ग्रंथांतील रहस्य आत्मसात् करण्याच्या दृष्टीनें ते त्यांचें अवलोकन करीत. कालनिर्णय, पाठचर्चा, असल्या बाह्यांगांकडे त्यांचें लक्ष होतें असें दिसत नाहीं. या ग्रंथांची शिकवण मनावर बिंबावी असा त्यांचा रोख दिसतो. आपल्या मनांत नवीन राजकारणाची मांडणी करतांना खाडिलकरांचें तत्त्वचिंतन वरील धोरणानें आणि दिशेनें चाले. टिळकांचे अंतर्गत विचार आपल्या लेखांतून बेमालूम प्रकट व्हावे ही ईर्ष्या त्यांनीं आपल्या मनांत वागविली होती. या ध्यासामुळेंच टिळकांच्या मनांतल्याच गोष्टी जणूं कांहीं त्यांच्या लेखांतून उठून येत असें वाटे आणि त्यामुळें साधारण वाचकाला खाडिलकरांचा लेख टिळकांच्या लेखापासून एकाएकीं निराळा काढून दाखविणें कठिण पडत असे, इतकी एकात्मता खाडिलकरांनीं साध्य केली होती. ही एकात्मता बहिरंगापेक्षां अंतरंगावरच केंद्रित झाली होती हें मात्र विसरतां उपयोगी नाहीं.

## उद्दीपक आणि प्रेरक लेखनशैली

मथळ्यापासून उपसंहारापर्यंत टिळकांचा लेख सरळ, जोरदार परंतु कायदेशीर तर्कपद्धतीनें आणि कोटिक्रमानें भरलेला असा असे. खाडिलकरांच्या मनाचें वळण कायदेशीरपणांत रमणारें नव्हतें. त्यांची भाषाहि टिळकांसारखी अगदींच सरळ होती असें म्हणतां यावयाचें नाहीं. तथापि धडाडी आणि जोम या गुणांत ती टिळकांना शोभणारी असे. प्रतिपक्षाचे वाभाडे काढण्यांत टिळक अत्यंत कठोर आणि तीव्र स्वरूप धारण करीत. याहि गुणांत खाडिलकर टिळकांची सहज बरोबरी करूं शकतील इतके कुशल होते. पण तीव्रता आणि उपहास यांची पेरणी खाडिलकरांकडून जरा अधिकच होत असे असें म्हटलें

तर तें न्यायाचेंच होईल. 'मद्रासची मजलीस' या आपल्या अत्यंत बोचक लेखांत प्रतिपक्षाला हिणवून 'तिरडी'ची जी उपमा खाडिल-करांनीं योजिली ती आज चाळीस वर्षें झालीं तरी आमच्या स्मरणां-तून गेलेली नाहीं. आणि आम्ही कांहीं 'अमुक पक्षाचे अनुयायी' असा अभिनिवेश तेव्हांहि बाळगीत नव्हतों. स्थूलमानानें आमच्या मताचें माप टिळकपक्षाकडे झुकत होतें, तरीहि खाडिलकरांचें हें लिहिणें आम्हांला रुचलें नाहीं; मग त्यांच्या प्रतिपक्षीयांनीं केसरीवर किती आणि कशी लाखोली वाहिली असेल याची चाणाक्ष वाच-कांना सहज कल्पना येईल. जे कोणी ज्ञानप्रकाशचे एक मार्मिक आणि खोंचदार संपादक कै. बापूराव आंबेकर यांच्या टिळकांवरील लेखांचें पुस्तक वाचतील ते केसरी–विरोधी ज्ञानप्रकाशांतून अशा लिखाणाची कशी संभावना होत असेल याचा अंदाज सहज करू शकतील.

अशा कट्टरपणामुळेंच खाडिलकर केळकरांपेक्षां त्या वेळच्या 'केसरी'-पक्षांत अधिक प्रिय असत! विरोधी पक्षाचें नांवच मवाळ किंवा नरम पक्ष असें केसरी–बाजूकडून ठेवण्यांत आलें होतें आणि 'भिक्षां-देहि'–पक्ष म्हणूनहि त्याची बोळवण लो. टिळक देखील करीत! खेळीमेळीच्या मर्यादेपलीकडे जर अशी टर उडविण्याचें स्वरूप गेलें तर त्यापासून आधींच चिरफळलेला समाज तडे पडून फाटत जातो. समाजपटाची वीण आणि त्यांतील धाग्यांचा बाणा आणि ताणा हे जर मूळचेच मजबूत नसतील तर अशा छिद्रांचे मोठाले भोसके होतात आणि समाजाची शक्ति क्षीण होत जाते.

ही बाजू सोडली तर उद्दीपक आणि प्रेरक लेख लिहिण्यांतहि खाडिलकरांचा हातखंडा होता. असले लेख त्यांनीं मोठ्या उत्साहानें लिहिले. त्या वेळच्या राष्ट्रीय चळवळींच्या काळांत लोकांत चैतन्य

उत्पन्न करण्यास आणि लोकांचा उत्साह वाढविण्यास खाडिलकरांच्या तेजस्वी लेखांनीं केलेलें साहाय्य निःसंशय संस्मरणीय आहे. याचें एक उदाहरण चांगलें लक्षांत राहिलेलें व तेंहि टिळकांच्या दुसऱ्या संकटकालांतलेंच आहे. टिळकांना शिक्षा झाली आणि मुंबईंतील अखिल जनता इतकी प्रक्षुब्ध झाली कीं तेथील कामकरी वर्गानें केलेल्या असंतोषप्रदर्शनाला दंग्याचें स्वरूप आलें! मुंबई म्हणजे प्रागतिक किंवा मवाळ पक्षाचा बालेकिल्ला; असल्या या भरंवशाच्या म्हशीला टोणगा झाला तर तो टिळकप्रतिपक्षीयांना व सरकारला कसा सहन व्हावा? या आमच्या मुंबईंत अन् या तेल्यातांबोळ्यांच्या पुढाऱ्यावर जनतेकडून असा प्रेमवर्षाव व्हावा अं! ही क्रांतीच म्हटली पाहिजे होती! या क्रांतीची मीमांसा करून तिचें मर्म उकलून दाखविण्यासाठीं आमच्या खाडिलकरांनीं आपली लेखणी पुढें सरसावली आणि केसरींत ‘ सर्वांत पुढें मुंबईच कां ? ’ म्हणून लेखमाला लिहून एक अभिनव रीतीची अंतर्भेदी राजकीय उकल करून दाखवून हजारों वाचकांस चकित करून सोडलें! एखाद्या प्रश्नाचा खाडिलकर वरवर विचार करीत नसत. चार ठिकाणच्या सुप्रतिष्ठितांच्या मतांचा सुबकसा अनुवाद करून समाधान मानणारे संपादक खाडिलकर नव्हते! वरील लेखमालेसारख्या लेखांनीं खाडिलकरांच्या वजनदारीची मातब्बरी प्रकट झाली. त्यांचे जोडीदार केळकर हेहि कांहीं कमी नव्हते; पण त्यांचा ठसा निराळा. त्यांनींहि ‘ आयर्लंड आणि हिन्दुस्थान ’ या विषयावर जेव्हां विचारपरिप्लुत लेखमाला ‘ केसरींत ’ लिहिली, तेव्हां टिळक—शिष्यांची ही जोडी कशी कसलेली आहे याचा अनुभव सर्वांस येऊन गेला! ‘ सर्वांत पुढें मुंबईच कां ? ’ या लेखमालेंत स्वतंत्र अन्न खाणाऱ्याच्या रक्तांतच स्वातंत्र्यप्रीतीचें रक्त कसें खेळतें याची त्या काळीं तरी अभिनव वाटणारी

सखोल मीमांसा खाडिलकरांनीं केलेली वाचून आजहि आपली मान डोलल्याशिवाय राहणार नाहीं. आमचे काकासाहेब असे पट्टीचे राष्ट्रीय संपादक होते आणि म्हणूनच टिळकांच्या गादीवर ते आपल्या अंगच्या प्रौढीनेंच शोभत होते. खाडिलकरांची दुसरी पंचविशी याप्रमाणें वाढत्या पराक्रमानें आणि यशानें संपन्न झाली.

## गांधी—'संवादी' खाडिलकर

खाडिलकरांची तिसरी पंचविशी अर्थात् १९२२ ते १९४७-१९४८ ही म्हणतां येईल. दुसऱ्या पंचविशीच्या अखेरीस त्यांचा केसरीशीं संबंध तुटला. त्यांचें गुरुदैवत—लो० टिळक हेहि दिवंगत झाले आणि 'पुढें काय?' असा प्रश्न त्यांच्यासमोर उभा राहिला! या काळांत त्यांनीं 'नवाकाळ' नांवाचें दैनिक मुंबईंत सुरू करण्याचा धाडसी मनसुबा योजिला. माझे मित्र श्री. न. र. फाटक हे त्या वेळीं यंदेशेटजींच्या इंदुप्रकाशांत संपादकीय खात्यांत काम करीत असत. खाडिलकरांना वासुकाका जोशी यांचें प्रोत्साहन मिळालें होतें पण त्यांनीं योजिलेला मनसुबा तडीस नेणें कांहीं सोपें नव्हतें. अशा अवघड परिस्थितीशीं टक्कर देऊन काकासाहेबांनीं अखेर मुंबई जिंकलीच!

टिळक गेले आणि गांधी आले! त्यांनीं आपलें युगच सुरू केलें. या क्रांतीचीं पावलें खाडिलकरांनीं ओळखलीं. ते समजून चुकले कीं 'नवा काळ' येत आहे. म्हणून तेंच नांव घेऊन ते पुढें आले. पालटलेल्या काळाचें स्वरूप त्यांनीं ओळखलें. गांधींचें तत्त्वज्ञान आणि टिळकांचें तत्त्वज्ञान यांच्यांत कांहीं मूलभूत फरक होता. वास्तविक त्या दोन निराळ्या निष्ठा होत्या; तथापि त्या नित्यविरोधीच होत्या असें मात्र नव्हे; त्यांचा समन्वय होण्यासारखा होता. हरिहरांतील

अभेदाचा मनोहर आणि मार्मिक दृष्टांत देऊन केळकरांनीं या समन्वयाची चुणूक दाखविलीहि होती. हा समन्वय नित्यसमन्वय या कोटींत जरी जाऊं शकला नसता तरी अनित्यसमन्वयाची कोटि त्याला लाभूं शकली असती. गांधींनीं आपली निष्ठा राजकारणांत आणली तेव्हां तिला स्वाधीन परंतु लवचिक ठेवण्याचें सामंजस्य प्रत्ययास आणून दिलें होतें. हा लवचिक समन्वय खाडिलकरांनीं केला. गांधीवाद या नांवानें जें तत्त्वज्ञान वगैरे पुढें विकसित आणि विश्रुत झालें त्याचे अनेक भाष्यकार आज आपणांत आहेत. संपूर्णपणें या वादाशीं तद्रूप झालेल्यांची पहिली प्रत मानली तर त्यांत जसे काकासाहेब कालेलकर जाऊन बसतील त्याच पंक्तीला काकासाहेब खाडिलकर यांना नेऊन बसवितां येणार नाहीं असें आम्हांस वाटतें. पहिल्यांस जर **गांधीवादी** म्हटलें तर दुसऱ्यांस **गांधीसंवादी** म्हणणें योग्य होईल. काकासाहेब खाडिलकर यांस ‘ गांधीवादी ’ म्हणण्यापेक्षां ते ‘ गांधीसंवादी ’ वर्गांतच मोडतील असें म्हणणें वस्तुस्थितीस अधिक धरून होईल.

## मराठी दैनिकाचा धाडसी व यशस्वी प्रयत्न

येथें हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे कीं ‘ नवाकाळ ’ हें दैनिकपत्र होतें. काळ झपाट्यानें बदलत होता. ‘ केसरी ’ सारखीं साप्ताहिक पत्रें आतां नित्य जोरानें फोंफावणाऱ्या राष्ट्रीय जागृतीचा बोजा वाहण्यास तोटकीं पडत होतीं. साप्ताहिकांना दैनिकांची जोड देणें अवश्य झालें होतें. म्हणूनच टिळकपक्षियांनीं मुंबईस ‘ लोकमान्य ’ दैनिक चालू केलें होतें. ‘ राष्ट्रमत ’ दैनिकहि अशाच विचारांतून जन्मास आलें होतें. ज्ञानप्रकाश, इंदुप्रकाश इत्यादि जुनीं दैनिकें होतीं हें खरें; परंतु एक तर तीं मवाळपक्षीयांचीं आणि तींहि कशींबशीं रुटू-

खुट् चाललेली. खाडिलकरांना साप्ताहिकांचा अनुभव दीर्घकालीन होता; पण दैनिक चालवावयाचें तंत्र अगदीं निराळें. दैनिकाचा कारखाना संततधारेसारखा अहोरात्र चालवावा लागतो. बातमी—ताजी बातमी—पुरविण्याविषयीं दैनिकांच्या चालकांना फार दक्ष असावें लागतें. दैनिक हें विचारपत्रापेक्षां प्रचारपत्र या न्यायानेंच चालवावें लागतें. हीं सर्व तंत्रें सांभाळून खाडिलकरांनीं ' नवाकाळ ' मुंबई-सारख्या ठिकाणीं यशस्वी करून दाखविला व त्याला स्थैर्य आणि प्रतिष्ठा मिळवून दिली, हें त्यांचें त्यांच्या तिसऱ्या पंचविशींतील स्पृह-णीय यश गणलें पाहिजे.

मुंबईसारख्या ठिकाणीं असें वर कित्येक वेळां विशेषत्वानें म्हटलें आहे त्याचें मर्म थोडें ध्यानांत घेतलें पाहिजे. मुंबई शहराचा अगदीं जुना इतिहास घटकाभर बाजूस ठेवला तरी अव्वल इंग्रजीच्या नवीन युगाच्या सुरुवातीस महाराष्ट्र मंडळाचे पुढारी कै. नाना शंकरशेट हे होते. त्यांच्या काळीं त्यांचें आपल्या मुंबईवर जितकें वजन होतें तितकें महाराष्ट्रीय पुढाऱ्यांचें आणि अर्थात्च तदनुषंगानें महाराष्ट्रीय समाजा-चें वजन मुंबईंत पुढें राहिलें नाहीं. महाराष्ट्रीयांचें वजन पिढीपिढीला उतरतच गेलें. नाना शंकरशेट यांच्या मागून रावसाहेब मंडलीक हे महाराष्ट्रीयांचे म्होरके गणतां येतील. त्यांचें वजन नाना शंकरशेट यांच्यापेक्षां एकंदरींत जरा कमीच भरेल. नानांपेक्षां रावसाहेब विद्वत्तेंत वरचढ असतील, पण बहुजनसमाजांतलें वजन तोलून पाहिलें तर नानां-चें पारडें मंडलिकांपेक्षां केव्हांहि जडच भरेल. नाना गेले, रावसाहेब गेले आणि त्यांच्यामागून बोट घालून एकहि नांव त्या तोलाचें म्हणून घेतां येणार नाहीं. सर भालचन्द्र किंवा सर नारायण इत्यादि नांवें आठवतील; पण नाना—मंडलिकांच्या तोलाचें वजन त्यांना नव्हतें असें म्हटल्यानें त्यांच्या वास्तविक मोठेपणास कमीपणा आणल्याचा

दोष लावतां येणार नाहीं असें प्रांजलबुद्धीनें वाटतें. तात्पर्य, इ. स. १८०० ते १९०० या शतकांत महाराष्ट्रीयांचें वजन अंशाअंशानें कमीकमी होत होतें. हें महत्त्व वाढविण्याच्या हेतूनें असें जरी नाहीं तरी मराठी भाषा बोलणाऱ्या जनतेंत राष्ट्रीय जागृतीचा फैलाव करण्याच्या ईर्ष्येनें खाडिलकरांनीं 'नवा काळ' दैनिकाचा धाडसी मनसुबा योजिला आणि यशस्वी केला. काकासाहेबांच्या या महनीय सेवेसाठीं सर्व मराठी बोलणाऱ्या जनतेनें त्यांचें ऋण सदैव स्मरणांत ठेवलें पाहिजे.

साप्ताहिकांतील लेखांची दीप्ति दैनिकांतील लेखांत क्वचित्‌च आणतां येते. खाडिलकरांनीं 'नवाकाळ' आणि 'केसरी' यांतून लिहिलेल्या लेखसंभाराचें परीक्षण या दृष्टीनेंच केलें पाहिजे.

मुंबईंत गुजराती आणि इंग्रजी दैनिकांचाच पूर्वीं जोर होता. त्या जागीं मराठी दैनिकाला मानाचें स्थान, तसेंच वजन काकासाहेबांनीं प्राप्त करून दिलें. काकासाहेबांच्या पूर्वीं संदेशकर्ते अच्युतराव कोल्हटकर यांनीं मुंबई हलवून सोडली होती आणि या क्रांतीचा पहिला डंका कडाडून वाजविला होता; परंतु भडकपणावर भर न देतां भारदस्तपणावर भिस्त ठेवून काकासाहेबांनीं 'नवा काळ' ला मिळवून दिलेली प्रतिष्ठा हा त्यांच्या कामगिरीचा विशेष मनांत भरल्याशिवाय रहात नाहीं.

पूर्वीं केसरींत बोअरयुद्धाचे वेळीं, तदनंतर पहिल्या महायुद्धाचें मासिक समालोचन करतांना 'चित्रमयजगत्' मध्यें आणि अलीकडील महायुद्धासंबंधीं त्यांनीं बारकाईनें अभ्यास करून लिहिलेले लेख त्यांच्या एतद्विषयक सूक्ष्म व्यासंगाची भरपूर साक्ष देतात. खाडिलकरांच्या अभ्यासाचा हा विशेष सर्वांनींच वाखाणलेला आहे.

खाडिलकरांनीं वर्तमानपत्रांतून लिहिलेले निवडक लेख प्रसिद्ध

व्हावे म्हणून पुष्कळ वेळां खटपट झाली; परंतु काकासाहेबांनीं परवां-परवांपर्यंत या कामीं परवानगी दिली नाहीं येवढेंच नव्हे, तर उलट मोडताच घातला. पुढें त्यांची परवानगी मिळाली; परंतु आपले हे विखुरलेले लेख एकत्र छापलेले पाहण्याचा सुदिन उगवण्याच्या पूर्वीच त्यांचें देहावसान झालें. त्यांचे सुविद्य चिरंजीव त्यांची गादी उत्साहानें चालवीत आहेत. तेव्हां काकासाहेबांचा लेखसंभार आणि चरित्र हीं ते महाराष्ट्राला सादर करून हजारों वाचकांच्या आजवर अतृप्त राहिलेल्या आकांक्षा सत्वर तृप्त करतील असा भरंवसा आम्हांला वाटतो.

## समाजाची उंची वाढविणारा नाटककार

नाटककार म्हणून काकासाहेब खाडिलकरांनीं केलेली कामगिरी त्यांच्या वृत्तपत्रीय कामगिरीपेक्षांहि एक प्रकारें अधिक विख्यात आहे. नाटकांचे प्रेक्षक विविध वर्गांतले तर पक्षवादी वर्तमानपत्रांचे वाचक पक्षांतच अधिक! नाटकांची रुचि भिन्न भिन्न वर्गांतील लोकांतहि आढळते; पण तीच गोष्ट वर्तमानपत्रासंबंधानें आपणांस सांगतां येणार नाहीं. सार्वजनिक चळवळींची अभिरुचि असणाऱ्या वर्गांतच वर्तमानपत्रांची कदर होते; परंतु नाटकांचा प्रेक्षकवर्ग मनोरंजनाकडे ओढ असलेला, हौशी आणि रसिक असतो.

या नाट्यप्रिय वर्गाचीहि उपेक्षा काकासाहेबांनीं केली नाहीं. त्यांनीं एकाहून एक वरचढ अशीं चौदा नाटकें लिहून आपणांस 'नाट्याचार्य' म्हणून यथार्थपणें म्हणवून घेतलें. नटश्रेष्ठ बालगंधर्व आणि नाट्याचार्य खाडिलकर यांनीं मराठी नाट्यसृष्टीवर अनिर्बंध प्रभुत्व दोन तपांवर गाजविलें! या त्यांच्या यशाला तोड नाहीं.

खाडिलकरांनीं आपलीं नाटकें केवळ मनोरंजनासाठीं लिहिलेलीं

नाहींत हें सर्वमान्य आहे. अगदीं ‘ सवाईमाधवरावांचा मृत्यु ’ किंवा ‘ कांचनगडची मोहना ’ हीं त्यांचीं पहिलीं पहिलीं नाटकें घेतलीं तरी त्यांच्या मनांतले, लोकांच्या चित्ताला कांहीं चटका लावावा, वीर वृत्तीचें पोषण करावें वगैरे, हेतू स्पष्ट दिसून येतात. त्यांच्या ‘ कीचक-वधा ’ वर तर सरकारनें बंदीच घातली ! पौराणिक कथा घेऊन त्यांच्या द्वारें कालोचित वृत्तींचें पोषण करण्याचें त्यांचें कौशल्य अनन्यसाधारण होतें. मोठा कलावंत आपल्याबरोबर आपल्या समाजाचीहि उंची वाढवितो याचें काकासाहेब खाडिलकर हें एक उत्तम उदाहरण आहे.

केळकर–खाडिलकर हे दोघे टिळकशिष्य नाटकी झाले म्हणून कित्येक मोंवळे टिळकपंथी नाकें मुरडींत हें आम्हांस माहीत आहे. टिळकांना आपल्या शिष्यांची ही वृत्ति नापसंत असल्याचा पुष्कळ बोभाटाहि कानीं येत होता; परंतु या प्रवादांत तितकेंसें तथ्य नाहीं. परिणामकारक नाटकाचें जनजागृतीस केवढें साहाय्य होऊं शकतें, ही गोष्ट टिळकांना चांगली अवगत होती.

## “ हाथी चलत है अपनी गतमों ”

खाडिलकर भाषणें करीत तेव्हांहि त्यांच्या वृत्तींतील सारा आवेश आणि गांभीर्य दिसून येत; पण एकंदरींत ते थोडेंच बोलत हें खरें. अगदीं शेलक्या मंडळींच्या बैठकींत ते मोकळेपणानें हास्यविनोदहि करीत; पण एरव्ही ते लोकांशीं किंवा लोक त्यांच्याशीं बोलत असे प्रसंग विरळाच ! केळकरांचें याच्या अगदीं उलट असे !

खाडिलकर बोलत् क्वचित्, येवढेंच नाहीं तर ते कधीं वादविवादांतहि भाग घेत नसत. त्यांच्या नाटकांवर येवढ्या टीका झाल्या, इतकीं भाष्यें झालीं ! पण खाडिलकरांनीं एक वार ‘ काळ ’ पत्रांत सवाई

माधवरावांच्या मृत्यूच्या प्रकरणीं लिहिलेला लेख सोडला, तर त्या टीकांना अगर भाष्यांना उत्तरादाखल, चकार शब्दहि त्यांनीं काढिला नाहीं. खुलासा नाहीं, समर्थन नाहीं, कांहीं, कांहीं नाहीं ! 'हाथी चलत है अपनी गतमों' हा त्यांचा बाणा ! पन्नास वर्षे ते लेखणी हातांत घेऊन समाजासमोर उभे होते; परंतु असल्या कामासाठीं त्यांनीं टांक शाईत बुडविला असेल तर शपथ ! हा संयम विलक्षण तर खराच तथापि या मौनामुळें त्यांनीं अनेकांची निराशा केली हेंहि तितकेंच खरें !

असो ! असा बाणेदार देशभक्त, ज्वलंत लेखन-तपस्वी, चतुर आणि प्रभावी नाटककार व निष्कलंक चारित्र्याचा, धीमा, धडाडी-चा आणि धैर्यवान् मार्गदर्शक आपल्यांतून गेला याबद्दलची हळहळ केव्हांहि कमी होणार नाहीं.

---

# ७ कै. माधव गोविंद ऊर्फ बाबूराव भिडे

बालमित्राचा मृत्युलेख लिहिणें कपाळीं यावें यापरतें दुःख तें कोणतें? माधवरावासारखा सन्मित्र जोडतां आला यांतच आतां समाधान मानून राहिलें पाहिजे! आज तीस वर्षे झालीं; माधवरावांची मधुर संगति साधली. यापुढें केवळ स्मरण उरलें!

माधवरावांचें चरित्र लिहून काय दाखवावें? तो एक विरागी विद्वान् विमलमति पुरुष होऊन गेला. बत्तीस वर्षांत असा दुसरा कोणी आढळला नाहीं! सदा मनन, सदा निदिध्यास, सदा समाधान म्हणजे बाबूराव!

तसें म्हटलें तर आमच्या अगदीं भिन्न प्रकृति! कुठें इतिहाससंशोधन आणि कुठें परमार्थ! पण बाबूरावाचा परमार्थ साबडाभाबडा नव्हता. चिकाटीची कसोटी त्याच्या हातांत सदैव पाजळत असे!

शके १८२९ सालीं आम्ही दोघे फर्ग्युसन् कॉलेजांत शिकत होतों. पुढें बाबूराव मागें राहिला; इतर सहाध्यायी पुढें सरकले. तेव्हांपासूनच बाबूराव दीर्घोद्योगी व व्यासंगी. इंग्रजी, कादंबरी, तत्त्वज्ञान, शास्त्र सर्व शाखांतलें ज्ञान त्याच्या अभ्यासांत असे. काव्याचा तर तो खंदा अभ्यासी होता. ख्रिस्ती तत्त्वज्ञान व बायबल यांचा बाबूरावासारखा अभ्यासक आमच्या समाजांत विरळाच सांपडेल. जुनें व नवें मराठी काव्यवाङ्मय अशा शोधक बुद्धीनें त्यानें अभ्यासलेलें दिसे कीं,

त्याच्या संगतींत चर्चा करतांना मतभेद राहूनहि, नवा प्रकाश मिळाल्या-शिवाय राहत नसे.

जात्याच तीव्रबुद्धि, त्यामुळें इंग्रजी संस्कृत मराठी ग्रंथांतील वचनें बाबूरावाला शेंकडों हजारोंनीं पाठ असत! त्याच्या बुद्धीची धार किती तिखट तार्किक होती तें वादांतच कळे! भागवत, भारत, उपनिषदें, दासबोध, ज्ञानेश्वरी व तुकोबा हे त्याच्यापुढें अहर्निश जसे काय नाचत असत! या संतांच्या ग्रंथावरील त्याचीं मर्मग्राही प्रवचनें ऐकणें म्हणजे एक अलभ्य लाभच होता!

साधा पण मोठया खिशांचा एक छोटा कोट, डोक्याला काळी टोपी, जानव्याचें जुंबड अर्धवट बाहेर पडलेलें, बहुधा हातांत भाजी-साठीं घेतलेली पुणेरी झोळी असा त्याचा भ्रमंतीचा पोशाख असे. एकदां स्वारी बाहेर पडली म्हणजे कोठवर फेरी जाईल नेम नाहीं. जुन्या बाजारांत व जुन्या पुस्तकांच्या दुकानांत बैठक ही देवदर्शनाइतकी नित्य नेमाची होती. भाजीबाजार काय, पर्वतीच्या किंवा कुठल्या रानांत गवतांचें आणि वनस्पतींचें निरीक्षण काय, गारगोट्या वगैरें प्रस्तरांचें संग्रहण काय, हे सर्व प्रकार या भ्रमंतीच्या अनुषंगानें चालावयाचे. पण सारी भ्रमंती पुण्यांत आणि पुण्याभोंवती! पुण्याचा एवढा अभि-मान त्याला असे कीं, कांहीं पुसूं नये! 'सारें जग मी येथून पाहतों' हा त्याचा बाणा.'पुणें' त्यांतल्या त्यांत आपली पेठ. त्यांत आपली आळी यावर त्यांचें प्रवचन सुरू झालें म्हणजे मौज वाटे! त्यांची खोली एक खणाचीच असे. पण तेथें ब्रह्मांड भरलेलें आढळावयाचें! तेथेंच प्रव-चनें, तेथेंच शंकित, शिष्य, राजपुत्र, सरदार, परमार्थी, विद्वान् सर्व अधून मधून बाबूरांवाच्या वाक्गंगेत स्नान करीत असतांना दिसावयाचे. मग तें मुमुक्षुकर्ते पांगारकर असोत किंवा परमार्थ विचारमाला गुंफणारे गोविंद-

सुत असोत कीं, श्री. भाऊसाहेब युवराज मोरकर असोत या ख्रिस्ती वाङ्मयसेवक भास्करराव उजगरे असोत !

असो. बाबूरावांचा जन्म शके १८०९ च्या आषाढातला, वडील मोठे नामधारक; स्वतः बाबूरावांचे स्वप्नगुरुजी अक्कलकोटकर स्वामी. बाबूराव 'मुमुक्षु' पत्राचे सहसंपादक असतांना त्यांचे कांहीं सुन्दर लेख व कविता प्रसिद्ध झाल्याच होत्या. पुढें त्यांच्या 'मननामोदा'चे तीन खंड प्रसिद्ध झाले. एकवार तो ग्रंथ मराठीसाठीं एम्. ए. च्या परीक्षेलाहि अभ्यासाला ठेवला होता. कविता ते अधून मधून करीतच असत ! 'उगाच काय प्रसिद्ध करावें;' असेल कांहीं जीव तर होईल प्रसिद्ध नाहीं तर माझ्यामागें तूं आहेसच, करशील प्रसिद्ध असें त्यांनीं मला नेहमीं म्हणावें. अखेर तोच प्रसंग आला ! आणि एवढेंच पुरे !

———

# लेखसूचि

एकमेव विक्रेते
**कॉंटिनेंटल् प्रकाशन**
टिळकरोड, पुणे २.



# आगामी प्रकाशनें

**(१) आणि माणसाचा मुडदा पडला!**
ले. रामानंदसागर
अनु श्रीपाद जोशी

**(२) मुक्तजीवन व अनुभव आणि आचार**
ले जे कृष्णमूर्ति
अनु एन्. आर ढोले

**(३) महामहोपाध्याय पोतदार यांचीं भाषणें.**

**(४) सूर्यकुलव्यवस्था** ( अनेक लेखक )
जोतिर्विद्या परिसंस्थेच्या विद्यमाने
झालेल्या व्याख्यानाचा विस्तृत सारांश

**(५) लाखाची गोष्ट**
ले नाना जोग

**पां. रा. ढमढेरे प्रकाशन :**
३२२।३ सदाशिव पेठ, पुणें २.

